पैकीं कजबे निंब येथील सनद पेशजीं दिली ते बार जाली आहे, सबब एक [ वजा ] बाकी ७.

२ प्रांत कराड.

१ मौजे येराळें.

१ मौजे नागझरी.

२

९

१४

चवदा सनदा, रसानगी यादी, व गांवाची नेमणूक. परवानगी रूबरू.

३८–( ३०२ ) वेदमूर्ति रघुनाथभट बिन विठ्ठलभट उपनाम वैद्य यांणीं हुजूर किल्ले पुरंधर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, कैलासवासी राजाराम महाराज यांचें वृंदावन किल्ले सिंहगड येथें आहे, त्यांत आईसाहेब यांणीं बाणाची स्थापना करून त्याची पूजा वेदमूर्ति मोरेश्वरभट बिन नीळकंठभट उपनाम पळसकर पुराणीक दिंमत हुजुरात यास सांगोन, मौजे आंगलंबे तर्फ कर्यात मावळ हा गांव वृंदावनाकडे दरोबस्त इनाम आहे, त्यापैकीं मोईन सालीना बरहुकूम सनद. छ. ९ रबिलावल, सन खमस खमसेन.

सबा सबैन मया व अलफ जमादिलावल २६

५० श्रीस नैवेद्यास.

१५० भटजीस वेतन.

२००

दोनशें रुपये करार करून दिल्हे, त्यापासून भटजीनीं आह्मांस आईसाहेबांचे समक्ष नेहेमीं पूजेचें काम सांगितलें, त्यापासून आम्हीं पूजा करून दोनशें रुपये नेमणूकप्रमाणें सन सितेन पावेतों घेत आलों. सन सलास सितेनांत हुजुरून विसाजी केशव यांस देखरेख सांगितली, त्यांणीं सन सबा सितेनापासून मोईनपैकीं सवाशें रुपये कमी करून पाऊणशें रुपयेप्रमाणें देत आले, त्यास किल्यावरील वस्ती, नेहेमीं वर असावें लागतें, त्याचे कालक्षेप चालत नाहीं, कमी जाहल्यामुळें बह्मस्वही बहुत जाहलें, याजकरतां स्वामींनीं कृपालु होऊन मशारनिल्हे

( 38 ) There was a monument raised at fort Sinhgar in memory of Rájárám Máharáj. A grant previously made by Ayisáheb for the worship of a deity placed there was continued.

A. D. 1776-77.

यांणीं सन सबा सितेनापासून सन सीत सबैन पावेतों दरसाल सवाशें रुपये प्रमाणें बाकी राहिली आहे, ते झाडून देविले पाहिजे ह्मणोन; त्यावरून हे सनद सादर केली असे, तरी पेशजीं दोनशें रुपये मोईन भटजीस होती, त्यापैकीं तुह्मीं सन सबा सितेनांत रुपये १२५ सवाशें कमी केले होते, ते सन इसन्ने सबैनापासून करार करून दिल्हे असत, तरी पेशजीं-प्रमाणें दोनशें रुपये साल दरसाल गांवपैकीं देत जाणें, व सन इसन्ने सबैनापासून दरसाल सवाशें रुपये प्रमाणें सालगुदस्तां सन सीत सबैन पावेतों बाकी राहिली आहे, ते झाडून देणें, व साल मजकुरापासून नैवेद्य मुशाहिरे वगैरे खर्च पेशजींपासून चालत असेल, त्याप्रमाणें ज्याचे त्यास देऊन बाकी गांवचा ऐवज राहील, त्याची समाराधना करीत जाणें ह्मणोन, विसाजी केशव याचे नांवें. सनद १.

रसानगी याद.

३९-(५०१) यवतेश्वर येथील डोंगराचा नळ पाण्याचा सातारियास राजवाड्यांत येत आहे, तो जागा जागा जाया जाला आहे, त्याचे दागदोजीस दोन तीन हजार रुपये लागतील, ते सरकारांत विनंति करून घ्यावे ह्मणोन, तुह्मीं सदाशिव अनंत यास पत्र लिहिलें, त्याजवरून त्यांणीं सरकारांत विनंति केली, त्यास इतका ऐवज द्यावयाची सोय नाहीं, अगत्या आगत्य पाहून, नळाची मरामत करण्याबद्दल रुपये ८०० आठशें पर्यंत लाऊन, नळ नीट करणें ह्मणोन, कृष्णराव अनंत याचे नांवें. सनद १.

समान सबैन मया व अलफ रमजान २२

परवानगी रूबरू.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

४०-(५०८) श्रीमंत महाराज राजश्री स्वामी यांचे पुत्रास दांडपट्टा वगैरे शिकण्याबद्दल निंबाजी बिन तुकाजी पवार पहिलवान प्यादा दिंमत रामजी यादव यास पाठविलें आहे, त्यास रोजमरा दुमाही रुपये १२ बारा रुपये रोजमरा देविला असे, तरी छ. ५ साबानचा रोजमरा हुजूर पावला आहे, पुढें तारीख भरल्यावर सदरहूप्रमाणें रोजमरा दुमाहीचा दुमाही चाकरी घेऊन किल्ले सातारापैकीं देत जाणें ह्मणोन. बाबूराव कृष्ण याचे नांवें. छ. ८ साबान. सनद १.

समान सबैन मया व अलफ सवाल ३०

रसानगी यादी.

---

(39) An aqueduct conveying water from Yevateshwar hill to the palace in Satara, being out of repair, sanction of Rs. 800 was given for repairing it.

A. D. 1777-78.

(40) Nimbáji bin Tukáji Pawár was sent to Satara on a salary of Rs. 12 every two months for training the Rája's son in the use of the sword.

A. D. 1777-78.

४१-( ६९९ ) श्रीमंत महाराज कैलासवासी राजाराम साहेब यांची समाध सिंहगडीं आहे, तिजवरील बाण पूर्वी सरकारांत आणला होता, तो हल्लीं तुम्हांकडे पाठविला आहे, तर पूर्ववतप्रमाणें बाण समाधीवर ठेवणें म्हणोन, नारो महादेव याचे नांवें. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर ३

परवानगी रूबरू.

४२-( ६०७ ) श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचें लग्न व्हावयाचें, याजकरतां येथून बळवंतराव मुढे पागा, व पथक सुद्धां तुह्मांकडे पाठविले आहेत, तरी हे तेथें राहतील तों पावेतों यांजकडील पागेचीं घोडीं आहेत, त्यांस वैरण प्रांत सातारा येथील कुरणपैकीं बेगमी करून देत जाणें ह्मणोन, कृष्णराव अनंत मुक्काम सातारा याचे नांवें. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ रबिलाखर २५

४३-( ६१३ ) कमाविसभेट राजश्री राव यांस महाराज छत्रपति स्वामीकडील वस्त्रें साताऱ्याहून आलीं, ते गुजारत शेटी जरडा खिजमतगार, सनगें ऐकूण.

समानीन मया व अलफ जमादिलाकर

| रुपये. | | सनगें |
|---|---|---|
| ७५ | मंदिले | १ |
| ३७॥ | झगा बादली | १ |
| ७५ | चादर बादली | १ |
| ३७॥ | तुंबा किनखापी | १ |
| २२५ | | ४ |

४४-( ६६८ ) सौभाग्यवती दुर्गाबाई थोरली धनीण कैलासवासी जाली, त्यांचे उत्तरकार्यासमईं ब्राह्मणांस दोन चावर जमीन भूमिदानास दिली ते आपणाकडून देवविली, त्या पैकीं कांहीं जमीन ब्राम्हणांस पावली, बाकी जमीन राहिली ते अद्याप ब्राम्हणांस पावली नाहीं, त्यास दोन चावरें ज-

समानीन मया व अलफ मोहरम ८

---

( 41 ) The monument of Rájáram Mahárаj was at fort Sinhagad. An idol which was there was brought to Poona. It was now returned to Sinhagad.

A. D. 1778-79.

( 42 ) The marriage of the Satara Rája being about to be celebrated, a body of horse was sent to Satara to be present on the occasion.

A. D. 1777-78.

( 43 ) Clothes worth Rs. 225 were received as present from the Satara Rájá.

A. D. 1779-80.

( 44 ) There is an allusion in this Sanad to the death of the eldest Ráni of the Satara Rájá called Durgábái. Land was given in Inam to Brahmins on the occasion of the performance of her obsequies.

A. D. 1779-80.

४५-(७०१) सदाशिव दिनकर कमाविसदार, कसबे खेड शिवापूर याचे नांवे सनद कीं, शिवापूरचे बागेपैकीं आंबे पिकले इरसाल नामी श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति यांजकडे सातारियास दर रवानगीस दीडशेंप्रमाणें तीन रवानग्या मिळोन आंबे सुमार ४५० साडे चारशें, सरकारचे खिजमतगार पाठविले आहेत, यांजबरोबर रवाना करणें म्हणोन. सनद १.

इसने समानीन
मया व अलफ
जमादिलाकर

परवानगी रूबरू.

४६-(७९८) नारायणजी मोहिते, श्रीमंत महाराज शाहू छत्रपति स्वामी यांचे सासरे, यांस घरचे बेगमीस पांचशें रुपयांचा गांव व पांचशें रुपये इतलाख द्यावयाचा साल गुदस्त करार केला, त्यापैकीं इतलाख साल गुदस्त साल मजकूर मिळोन रुपये १००० एक हजार रुपये देविले असेत, तरी प्रांत कराड पैकीं पावते करणें. पेस्तर साल सन सलास समानीनापासून पांचशें रुपये इतलाख द्यावयाचे, त्यास प्रांत वाई पैकीं मौजे माजगांव तर्फ सातारा हा गांव दुमालदार खेरीज करून बाकी सुभाकडील अंमल बेगमीबद्दल पेस्तर सालापासून लावून दिला, त्याची बेरीज रुपये ६७०, पैकीं वजा, पांचशें रुपयांचा गांव द्यावा सबब वजा रुपये ५००, बाकी रुपये १७० एकशें सत्तर रुपये गांवचे जाजती जाहले, ते इतलाखांत धरावयाचा करार करून इतलाखपैकीं बाकी राहिले ते रुपये ३३० तीनशें तीस रुपये दरसाल देविले असेत, तरी प्रांत कराड पैकीं सदर्हू तीनशें तीस रुपये मशारनिल्हे यास दरसाल पाववीत जाणें म्हणोन, श्रीनिवास शामराव मामलेदार प्रांत मजकूर याचे नांवें. सनद १. रसानगी यादी.

इसने समानीन
मया व अलफ
जमादिलाकर १४

४७-( ७८० ) बद्दल श्रीमंत महाराज राजश्री स्वामी छत्रपति छ. २० रोजीं वाड्यांत आले, ते समईं राजश्री राव यांसी पोशाक दिला, तो गुजारत जिवाजी कोटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

सलास समानीन
मया व अलफ
रबिलावल २३

---

( 45 ) Mangoes from the Sivápoor garden were sent to the Rájá of Satara as a present.

A. D. 1781-82.

( 46 ) It was agreed in the preceding year that Náráyanji Mohite, father-in-law of the Mahárája Sháhu, should be given Rs. 500 in cash and a village worth Rs. 500. The agreement was now carried out.

A. D. 1781-82.

( 47 ) Presents were received from the Satara Rájá on the occasion of his coming to the Peshvá's wádá on the 20th of this month.

A. D. 1782-83.

७९ चिरा जरी बादली १
११० झगा जरी बादली १
३० वोढणी जरी बादली १
२९ तुंबा किनखापी १

२४०

४८-( ७८१ ) बद्दल श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांजकडे खासास्वारी रोज गुदस्तां दर्शनास गेली, ते समई पोशाख दिल्हा, तो गुजारत जिवाजी कोटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

सलास समानीन मया व अलफ रविलावल २४

६९ चिरा जरी बादली १
४० वोढणी जरी बादली १
१२० झगा जरी बादली १
३९ तुंबा किनखापी १

२६०

४९-( ८११ ) सौभाग्यवती संतूबाई माहाडीक, श्रीमंत महाराज राजश्री शाहू छत्रपति स्वामी यांची बहीण, यांस महाराजांचीं दोन लग्नें जाहालीं, त्यास करवलीपणाचा मान ते समई द्यावयाचा, तो पावला नाहीं, सबब हल्लीं जमीन अवल दूम सीम तिहीं प्रतीची चावर ·।।· अर्धा एकूण, साठ बिघे कुलबाब कुलकानू दरोबस्त नूतन इनाम करार करून दिल्ही असे, तरी सदरहूप्रमाणें अर्धा चावर जमीन प्रांत कऱ्हाडपैकीं नेमून दुमाला करून यांचे नांवें इनाम खर्च लिहीत जाणें; आणि जमिनीचा चतुःसीमापूर्वक मोजणीजाबता लिहून हुजूर पाठवणें, त्याप्रमाणें इनामपत्रें करून दिल्हीं जातील ह्मणून, श्रीनिवास शामराव याचे नांवें. सनद.

आर्बा समानीन मया व अलफ साबान २५

रसानगी यादी.

---

(48) Presents were received from Mátoshri Ayisáheb on the occasion of the visit paid to her by the Peshvá on the preceding day.

A. D. 1782-83.

(49) Santubái Mahádik, the Rájá's sister, was given half a cháhur of land in Inam as a customary present on the occasion of the marriages of the Satara Rájá.

A. D. 1783-84.

५०-( ८१२ ) नरसिंगराव गुजर, श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचे मेहुणे, यांस जातीस तैनात सालीना करार केली, ते रुपये १०००, पैकीं वेजा गांव लाऊन द्यावयाचा रुपये ५००, बाकी रुपये ५०० पांचशें रुपयांची डौल साताऱ्याकडे नेमणूक केली असे, तरी सदरहू पांचशें रुपये सालीना देत जाणें ह्मणून, कृष्णराव अनंत याचे नांवें. सनद १.

आर्बा समानीन मया व अलफ साबान २६

रसानगी यादी.

५१-( ८१३ ) श्रीमंत मातुश्री आईसाहेब वाडा दुसरा यांचे आप्त यांस कुटुंबाचे बेगमीस सालीना नेमणूक. रुपये.

आर्बा समानीन मया व अलफ साबान २६

२०० खंडेराव शिर्के.
२०० खंडेराव गुजर.

४००

एकूण चारशें रुपये साल मजकुरापासून करार करून डौल साताऱ्याकडे नेमणूक केली असे, तरी सदरहू चारशें रुपये सालीना देत जाणें ह्मणून, कृष्णराव अनंत याचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

५२-( ८१४ ) संताजी भोसले, श्रीमंत मातुश्री आईसाहेब वाडा दुसरा यांचे मेहुणे, यांस कुटुंबाचे बेगमीस सालीना नेमणूक. रुपये.

आर्बा समानीन मया व अलफ साबान २७

६०० खासा संताजी भोसले यांस. रुपये.
२०० सौभाग्यवती ठमाबाई स्त्री, आईसाहेबांची बहीण, यांस.

८००

एकूण आठशें रुपये सालमजकुरीपासून करार करून डौल साताऱ्याकडे नेमणूक केली

---

(50) Narsingrao Guzar, brother-in-law of the Satara Rájá, was given a grant of Rupees 1000 in land and cash.
A. D. 1783-84.

(51) An allowance of Rupees 200 each was given to Khanderao Shirke, and Khanderao Guzar, relatives of the 2nd wife of the Satara Rájá.
A. D. 1783-84.

(52) An allowance of Rupees 200 was given to Thamábái, sister of the Rájá's second wife; and one of Rupees 600, was given to Thamábái's husband, Santáji Bhosle.
A. D. 1783-84.

असे, तरी सदर्हू आठशें रुपये सालीना देत जाणें ह्मणून, कृष्णराव अनंत याचे नांवें. सनद.

रसानगी यादी.

५३-(८६२) श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांस सनगें रूबरू पाहून सातारियास पाठविलीं, ताहा बापूजी जाधव हुजरे, व गिरजापा मोहिते, जामदार दिंमत हुजुरात, सनगें एकूण. आंख.

खमस समानीन मया व अलफ जिल्काद १५

१०० पितांबर मर्दानी आसवली किनारदार १

आंख.

६८२ शाल फर्द केशरी २, दर ३४१

४०० पामरी सोंवळ्याची अमदाबादी १

८९० जामेवार जरी निशाणास (२)

४३० प्रत १

४२० प्रत १

८९० २

१ बासनास खादीपैकीं ।·

२५३३ ६।

५४-(९३९) श्रीमंत महाराज मातुश्री आईसाहेब यांजकडील डौलाची दिवाणगिरी पेशजींपासून रामराव विष्णु यांजकडे आहे, त्यास ते मृत्यु पावले, सबब त्यांचे पुत्र गोपाळराव राम यांजकडे दिवाणगिरी करार केली असे, तरी यांजकडील कारकुनापासून पेशजींप्रमाणें दिवाणगिरीचें कामकाज चालणें म्हणोन. सनदा.

सबा समानीन मया व अलफ सफर ६

१ कृष्णराव अनंत यांस.

१ बाबूराव कृष्ण यांस.

एकूण दोन सनदा. रसानगी याद.

---

(53) Clothes worth Rupees 2533 were sent as a present to the Rájá of Satara.

A. D. 1784-85.

(54) The office of Diwán to Shrimant Maháraj Mátushri Ayi-Sáheb, which was held by Rámrao Vishnoo, was on his death bestowed upon his son Gopálrao.

A. D. 1876-87.

५५-( ९४१ ) हुजुरांत खर्च-श्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांस पुत्र जाहला, स-
सब समानीन बब बाळंतविडा पाठविला, तसलमात श्रीनिवास त्रिंबक कारकून शिलेदार,
मया व अलफ व पांडु मुळ्या, व मायाजी बाबर खिजमतगार, सनगें एकूण. आंख.
रबिलाखर ८ आंख.

११९९ मातुश्री आईसाहेब यांस सनगें एकूण.

३८० लुगडें १
३०४ शेला जाफरखानी १
४४१ किनखाप १
३० खण १

११९९ ४

१२१०॥ वाडा पहिला.

१०१९॥ प्रत.

३९७॥ पातळ जरी १
२२५ शेला जाफरखानी १
४०० किनखाप १
३३ खण जरी चौकडीदार १

१०१९॥ ४

१९५ पुत्रास.

१ कुंची.
१ पेहरणें.

२

खातें गुजारत कचू शिंपी सनगें एकूण आठ.

११० किनखाप गज ॥१ सनंग ८=
७६ चोळखण जरी कारचोबी पेहरण्यास १
एकूण गज ।३
९ अस्तरास सनंग ८=

१९९ १।

(55) Presents were sent to the Satara Rájá and his wives in honour of the birth of a son to the Rájá.
A. D. 1786-87.

9261

९००।वाडा दुसरा.

२३७॥ पातळ जरी १

२२९।॥ शेला जाफरखानी १

४०० किनखाप १

३३ खण जरी काजळी चौकडीदार १

९००। ४

९ बासनास.

७ शेला साधा हात ७ सनंग ·।·

आंख.

२ खादीपैकी ·॥·

९ ·।॥·

३२७४।॥· १४

५६–( १०१९ ) कसबे संगमेश्वर तर्फ मजकूर तालुके रत्नागिरी येथें श्रीमंत कैलासवासी संभाजी महाराज राज्य करीत होते, त्या राजवाड्याचे चौथऱ्यावर सदाशिव दादाजी मावलंगकर यांणीं आपले घराचा चौथरा ह्मणोन घर बांधों लागले, तेव्हां समस्त जोशी संगमेश्वरकर यांणीं राजवाड्याचे चौथऱ्यावर सदाशिव दादाजी घर बांधणार यास ताकीद करून घर बांधूं न द्यावें म्हणोन तुह्मांस सांगितलें, व हुजूरही विनंति केली, तेव्हां हुजूर चौकशी जालियाशिवाय घर बांधों नये, याप्रमाणें जालें असतां तिगस्तां चौकशी न होतां त्या चौथऱ्यावर घर बांधलें, तेव्हां गणपतराव जिवाजी सर सुभा यास चौकशी करून घर मोडावें, ह्मणून आज्ञा जाली असतां, गुदस्तां पहिलें घर बांधिलें आहे, त्या लगते नवें काम घराचें केलें, ह्मणोन समस्त जोशी संगमेश्वरकर यांणीं हुजूर विदित केलें ऐशियास राजवाड्याचा चौथरा तुह्मांस समजला असतां सदाशिव दादाजी यास चौथऱ्यावर घर बांधों दिलेंत, हें ठीक न

इह्हिदे तिसैन मया व अलफ रबिलावल ६

( 56 ) Sadáşiva Dádáji Mawlangkar built a house on the for[illegible] of the palace belonging to the prev[illegible] Mahárāj at Sangmeshwar. The h[illegible] pulled down, and the site inclu[illegible] garden was retained by Government.

A. D. 1790-91.

केलें, त्याजवरून हल्लीं हें पत्र तुह्मांस सादर केलें असे, तरी घर मोडावयास सरकारांतून मोरो आत्माराम कारकून व ढलाईत आसामी २ पाठविले आहेत; हे घर मोडतील त्यास मोडूं देणें. राजवाड्याचे चवथऱ्याजवळ महाराजांची बाग आहे, त्यासुद्धां जागा सरकारांत ठेवणें म्हणोन, महिपतराव कृष्ण याचे नांवें चिटणिसी. पत्र १.

५७–( १०२८ ) श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचे दोघी कन्यांचीं लग्नें आहेत; त्याचें साहित्य सातारियास पावतें करणें म्हणोन. सनदा.

इहिदे तिसेन मया व अलफ जमादिलाखर १९

परगणे शिराळें निसबत रघुनाथ चिंतामण याजकडून. सुमार.

१५००० कडबा पुले.
५००० पत्रावळी.
५००० पानें केळीचीं.

२५०००

एकूण पंचवीस हजार सुमारी देणें, याखेरीज बेगारी आसामी ५० पन्नास एक महिना नेमून देणें म्हणोन. सनद १.

रघुनाथ चिमणाजी सचिव यांजकडून. सुमारी.

८००० पत्रावळी.
१७१३ बुरुडकाम.
७५० तट्ये.
१०० हारे.
५०० शिपतरें.
५० दुरड्या.
१०० पाट्या.
१०० सुपें.

परशराम श्रीनिवास प्रतिनिधी यांजकडून सुमारी. सुमार.

१०००० पत्रावळी.
१५००० कडबा पुले.
१७१२ बुरुडकाम.
७५० तट्ये.
१०० हाऱ्ये.
५० दुरड्या.
५०० शिपतरें.
१०० पाट्या.
१०० सुपें.
५० वरोळ्या.
५० केरसुण्या.
१२ चाळणी.

१७१२

९७५ कुंभारकाम.
७५ रांजण.
७५० घागरी.

(57) The marriages of two daughters of the Satara Rájá being about to be celebrated, orders were issued to the Pratinidhi, the Sachiv, and other officers for supplying the necessary provisions for the ceremonies.

A. D. 1790-91.

५० वरोळ्या.
५० केरसुण्या.
१३ चाळणी.

१७१३

९७१३

एकूण नऊ हजार सातशें तेरा सुमारें पावते करावे, याखेरीज बेगारी आसामी ५० पन्नास एक महिना नेमून द्यावे ह्मणून. सनद १.

विश्वासराव नारायण किल्ले वंदन याजकडून सुमारी. सुमार.
५००० कडबा पुले.
२००० पत्रावळी.

७०००

सात हजार सुमारी पावते करणें ह्मणोन. सनद १.

१५० मडकीं लाहान थोर जात.

९७५

२७६८७

एकूण सत्तावीस हजार सहाशें सत्याशीं सुमारी पावते करावे, याखेरीज बेगारी आसामी ५० पन्नास एकमाही नेमून द्यावे ह्मणोन. सनद १.

श्रीनिवास शामराव प्रांत कराड याजकडून सुमारी. सुमार.
१०००० कडबा पुले.
५००० पत्रावळी.
९७५ कुंभारकाम.
७५ रांजण.
७५० घागरी.
१५० मडकीं लहान थोर जात.

९७५

१५७९५ ( १५९७५ )

एकूण पंधरा हजार नऊशें पंच्याहत्तर सुमारी पावते करावे, याखेरीज बेगारी आसामी ५० पन्नास एक महिना नेमून देणें ह्मणोन. सनद १.

एकूण पांच सनदा. रसानगी यादी.

५८ ( १०४२ ) कमाविस भेट राजश्री राव, सातारियास स्वारी गेली होती, ते समईं आली, ती गुजारत जानाजी जाबक खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

इसन्ने तिसैन मया व अलफ रविलावल ६

२०२९॥ श्रीमंत महाराज छत्रपति स्वामी यांचे दर्शनास गेले, ते समईं आलीं, तीं सनगें एकूण. रुपये.
४३७॥ प्रथमदर्शनीं सनगें एकूण किंमत. रुपये.
३०० श्रीमंत महाराज यांजकडील दुपटा अनारदाणी १

( 58 ) The Peshwá paid a visit to the Rájá at Satara. The clothes received by him as presents from the Rájá & his two Rânis are credited on this date.

A. D. 1791-92.

९० आईसाहेब यांजकडील बोढणी बादली १
९० वाडा पहिला बोढणी बादली १
३७॥ वाडा दुसरा बोढणी बादली १

४३७॥ ४

१९९२ निरोप समई वस्त्रें दिल्हीं, तीं सनगें एकूण. रुपये.

१०२९ श्रीमंत महाराज यांजकडील.
३०० तिवट अनारदाणा १
४५० दुपटा अनारदाणा १
१२९ जामेवार जरी बादली. (२)

६९ २० (६०)

१२९ २
१५० किनखाप १

१०२५ ५

२३९ बाबत आईसाहेब.
२९ तिवट १
१५० दुपटा १
२४ शेले साधे २, दर १२
४० किनखाप ॥

२३९ ४॥

१६४ वाडा पहिला.
२९ तिवट १
७९ जाफरखानी १
२४ शेले साधे २, दर १२
४० किनखाप ॥

१६४ ४॥

* * * * *

५९-( १०६७ ) श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांची स्त्री सौभाग्यवती आनंदीबाई वाडा पहिला यांस पुत्र जाहाला; त्यास बारशास व साखर वाटण्यास व हेलकरणीस वगैरे रुपये १००० एक हजार रुपये खर्च करणें ह्मणोन, कृष्णराव अनंत याचे नांवें. सनद १.

सलास तिसैन मया व अलफ रजब ११.

परवानगी रूबरू.

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

## २ पेशवे, ( अ ) नारायणराव पेशवे यांचा वध.

६० (४४) सुमेरसिंग गारदी याची सासुरवाड कजबे चांदवड येथें आहे, त्यास तेथें त्याची बायको व मुलें माणसें आहेत, त्यांस पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेवणें, पोटास अडशेरी देणें. वस्तभाव वगैरे जी असेल त्याचा बारकाईनें शोध करून मोजदाद करून बराबर प्यादे देऊन बंदोबस्तानें हुजूर पुण्यास पाठऊन देणें म्हणोन, हवालदार व कारकून किल्ले चांदवड निजबत तुकोजी होळकर याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

परवानगी रूबरू.

---

( 59 ) Ánandibái, the first wife of the Satara Rájá, having given birth to a son, sanction was given to the expenditure of Rs. 1000 for distributing sugar and for the ceremonies to be performed on the 12th day after birth.

A. D. 1792-93.

[ 1 ] POLITICAL MATTERS.

( B ) Matters relating to

( 2 ) PESHWÁ—( a ) Náráyanrao's Murder.

( 60 ) The wife of Sumersing Gárdi with his family was at Chándwad at her father's house. The officer of the fort of Chándwad was directed to keep her and Sumersing's family in cofinement, to attach his property, and to send it to Poona.

A. D. 1773-74.

६१-( ४५ ) किल्ले हाय येथें अटकेस ठेवावयास पाठविले असेत, तरी पायांत बिड्या घालून पक्या बंदोबस्तानें ठेविणें, पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें म्हणोन, हवालदार व कारकून यांस. छ. १७ जिल्काद. सनदा.

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

१ किल्ले विसापूर येथें शिवराम गिरमाजी येविशीं.

१ किल्ले घनगड येथें अंतोबा घाणेकर येविशीं.

१ किल्ले लोहगड येथें केशवराव बल्लाळ येविशीं.

---

३

दुसरे जागा पाठविणें सबब दूर.

केसो बल्लाळ गोगटे याचीं माणसें किल्ले राजमाची येथें आहेत, तीं अटकेंत ठेविलीं असेत, तरी माणसें पक्या बंदोबस्तानें ठेविणें, व पाहारे चवक्या ठेविणें म्हणोन, रामराव नारायण यास. छ. १७ जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

किल्ले शिवनेर येथें खरकसिंगाचीं मुलें माणसें आहेत, तीं अटकेंत ठेविलीं असेत, तरी पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेविणें, व घरीं चवक्या बसविणें म्हणोन, उध्धो विरेश्वर याचे नांवें. छ. १७ जिल्काद. सनद १.

आबाजी महादेव याचीं मुलें माणसें नागोठण्यास आहेत, व त्याचे भाऊ काशीहून आले, ते अवचितगडास अगर नागोठण्यास असतील, त्यांस पत्र दर्शनीं कैद धरून वस्तवानीसुद्धां जप्त करून मुलें माणसें किल्यावर बंदोबस्तानें अटकेंत ठेविणें; व त्याचे भावाचे पायांत बिडी घालून सुरगडावर पक्या बंदोबस्तानें ठेविणें; ज्या किल्यावर मुलें माणसें ठेवाल त्या किल्यावर त्यास न ठेविणें. लिहिल्याप्रमाणें सुरगडावर ठेविणें; आणि पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें. जप्तीचा सर्व वस्तवानीचा जाबता लिहून हुजूर पाठऊन देणें म्हणोन, गणेश त्रिंबक याचे नांवें. छ. १७ जिल्काद. सनद १.

---

(61) Orders for the imprisonment of the following persons with their families, and for the attachment of their property, appear in the diaries of this date.

A. D. 1773-74.

1 Ṣiwarám Girmáji.

1 Antobá Ghánekar.

1 Keshavrao Ballál.

1 Kharaksing.

1 Abáji Mahádeo. ( of Nágothne. )

तुळाजी पवार खिजमतगार याचीं मुलें माणसें मौजे गोलेगांव परगणे मजकूर येथें आहेत, त्यांस कैद करावयाची आज्ञा केली असे, तरी पत्र दर्शनीं कबिलेसुद्धां माणसें कैद करून हुजूर पुण्यास पाठऊन देणें. वस्तवानी जप्त करून वस्तवानीचाही जाबता हुजूर पाठऊन देणें म्हणोन, बाबूराव माणकेश्वर सुभेदार, परगणे कर्डे रांजणगांव यांचे नांवें. छ. १७ जिल्काद.
सनद १.

केशवराव बल्लाळ यास अटकेंत ठेवावयास पाठविलें असे, तरी यास पक्या बंदोबस्तानें साष्टीचे किल्यांत अटकेंत ठेऊन पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें. तुम्हांजवळ मशारनिल्हे येऊन पोंहचल्याचा जाब पाठविणें म्हणोन, आनंदराव राम याचे नांवें. छ. १८ जिल्काद.
सनद १.

त्र्यंबकजी भालेराव याचीं मुलें माणसें मौजे कळंब नांदूर प्रांत जुन्नर येथें आहेत, त्याची जप्ती करावयास रघुनाथ हरी यास आज्ञा केली आहे, ते व तुम्हांकडे माणसें पाठवितील, त्यांस पक्या बंदोबस्तानें किल्ले शिवनेर येथें अटकेंत ठेऊन पोटास अडशेरी देत जाणें म्हणोन, उध्धो विरेश्वर तालुके शिवनेर याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.
परवानगी रूबरू.

सखाराम हरी याचीं मुलें माणसें मौजे उरवडें तर्फ मुठेखोर येथें आहेत, त्याची जप्ती करून वस्तभावेची वगैरे मोजदाद करून जाबता हुजूर पाठविणें; व मुलें माणसें किल्ले सिंहगड येथें पक्या बंदोबस्तानें अटकेस ठेऊन शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें; व मशारनिल्हेचे घरीं घोडीं व उंटें वगैरे असतील ते जलद हुजूर पाठविणें, व रामचंद्र विठ्ठल निजबत चिटणीस याचें घर जे मजकुरीं आहे, त्यास त्याची जप्ती करून व वस्तभाव वगैरे याचा जाबता हुजूर पाठविणें, व मुलें माणसें किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शिधा मध्यमप्रतीचा देणें म्हणोन, आनंदराव जिवाजी याचे नांवें. छ. २० जिल्काद.
सनद १.
परवानगी रूबरू.

राजाराम गोविंद याचीं मुलें माणसें शहर अहमदनगर येथें आहेत, तीं किल्ले अहमदनगर येथें अटकेंत पक्या बंदोबस्तानें ठेऊन शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें; व त्याची वस्तभाव जेथें असेल तेथून बारकाईनें शोध करून आणून मोजदाद करून जाबता लिहून हुजूर

1 Tuláji Pawár ( Khijmatgár. )
1 Keso Ballál ( of Rajmáchi. )
1 Trimbakji Bhálerao ( of Kalamb Nándur. )
1 Sakháram Hari ( of Urawde in Taluka Muthekhore. )
1 Rajárám Govind ( Ahmednagar. )

पाठविणें; व परगणे कडेवलीत येथील देशमुखी वगैरे वतनें आहेत, त्यांपैकीं मशारनिल्हेचा हिसा जप्त करून आकार होईल तो किल्ले मजकूरचे हिशेबीं जमा करणें म्हणोन, महादाजी नारायण याचे नांवें. छ. २० माहे जिल्काद. सनद १.

बाबूराव बल्लाळ काणे याचीं मुलें माणसें कजबे तळें येथें आहेत, त्यास किल्ले तळगड येथें पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेविणें; व वस्तभाव जेथें असेल तेथें बारकाईनें शोध करून जप्त करणें, आणि जाबता हुजूर पाठविणें. माणसांस शिधा मध्यम प्रतीचा देत जाणें म्हणून, गोविंदराव व चिमाजी माणकर प्रांत राजापुरी याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

मल्हारराव कृष्ण सुमंत याचीं मुलें माणसें मौजे राजापूर परगणे कर्डे रांजणगांव येथें आहेत, त्यांस जप्त करून किल्ले अहमदनगर येथें पोंहचऊन देणें ह्मणोन, बाबूराव माणकेश्वर सुमेदार परगणे कर्डे रांजणगांव यास आज्ञा केली आहे, त्यास मशारनिल्हे मुलें माणसें तुह्मांकडे पाठवितील, त्यास किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन ब्राह्मण आसामी असतील त्यांस उत्तम प्रतीचा शिधा देत जाणें; व एकादी कुणबीण असेल, तीस शिरस्तेप्रमाणें अडशेरी देत जाणें ह्मणोन, महादाजी नारायण किल्ले अहमदनगर याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

महमद इसफ गारदी याचीं मुलें माणसें रोज्यास अगर शहर औरंगाबाद येथें असतील, त्यांचा बारकाईनें शोध करून तेथून धरून आणून किल्ले दौलताबाद येथें पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें; व वस्तभाव वगैरे याची मोजदाद करून किल्ले मजकुरीं ठेऊन जाबता हुजूर पाठविणें; व लोकांकडे कर्जवाम वगैरे पैका व वस्तभाव असेल त्यांचाही बारकाईनें शोध करून जप्त करून जाबता हुजूर पाठविणें ह्मणोन, धोंडो महादेव याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

सदाशिव रामचंद्र याचीं मुलें माणसें किल्ले मजकुरीं अटकेस ठेवावयास पाठविलीं आहेत, तरी पक्के बंदोबस्तानें ठेऊन उत्तमप्रत शिधा देत जाणें, ह्मणोन उदाजी वाळुंज हवालदार, व कारकून किल्ले लोहगड याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

1 Báburao Ballál Kâṇe. ( of Talen )

1 Malhárrao Krishna Sumant. ( Rajápur in Parganá Karden Ránjangaum. )

1 Mohamed Esuf Gárdi's family at Rozá or Aurangabad.

1 Sádáshiv Rámchandra ( appears to be an important personage. )

शिवाजी कान्हो याची बायको कजबे सासवडास माहेरास आहे, व बाजीराव गोविंद बर्वे याचीं माणसें मौजे गराडें येथें आहेत, त्यांची जप्ती करून वस्तभावेचा बारकाईनें शोध करून आणून मोजदाद करून जाबता हुजूर लिहून पाठविणें; व माणसांस शिधा मध्यमप्रत देत जाणें; व मौजे भिंवरी तर्फ करेपठार हा गांव बाजीराव गोविंद यांजकडे आहे, तो जप्त करून आकार होईल तो प्रांत पुणें येथील हिसाबीं जमा करणें ह्मणोन, नारो आपाजी याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

नूरमहमद गारदी याचीं मुलें माणसें रोज्यास, अगर शहर अवरंगाबाद येथें असतील, त्यांचा बारकाईनें शोध करून, तेथून धरून आणून, किल्ले दौलताबाद येथें पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें; व वस्तभाव वगैरे असेल, त्याची मोजदाद करून, किल्ले मजकुरीं ठेवून, जाबता हुजूर पाठविणें; व लोकांकडे कर्जवामवगैरे येणें असेल, त्याचाही शोध करून जप्त करणें; आणि हुजूर लेहून पाठविणें ह्मणोन, धोंडो महादेव याचे नांवें. छ. २० जिल्काद. सनद १.

हरि रघुनाथ भिडे याचीं मुलें माणसें मौजे आसरें येथें आहेत; तीं अटकेस ठेवावयाविषयीं हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी मशारनिल्हेचीं मुलें माणसें आणून किल्ले अवचितगड येथें पक्या बंदोबस्तानें ठेविणें; व त्याची वस्तभाव जप्त करून जप्तीचे जिनसांचा जाबता हुजूर लिहून पाठविणें. माणसांस शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें म्हणोन, गणेश त्रिंबक याचे नांवें. छ. २१ जिल्काद. सनद १.

अंताजी राम सावकार आनंदवल्लीस आहेत, त्यांस किल्ले त्र्यंबक येथें अटकेस ठेवण्यास आज्ञा केली असे, तरी तुम्हीं किल्ले मजकूर पैकीं लोक पाठऊन, आनंदवल्लीहून घेऊन जाऊन, पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेविणें. पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें. सरकारचे कारकून भास्कर बल्लाळ आनंदवल्लीस आहेत, ते तुम्हांस लिहितील तेव्हां त्यांजकडे प्यादे पाठवून, अंताजी रामास किल्ले मजकुरीं घेऊन जाऊन अटकेस ठेविणें म्हणोन, काशी बल्लाळ याचे नांवें. छ. २१ जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

अच्युतराव गणेश याचे बंधू व मुलें माणसें कजबे चांदवड येथें आहेत, त्यास किल्ले मजकूर अटकेंत आहेत. पक्या बंदोबस्तानें ठेऊन शिधा मध्यमप्रत देत जाणें. वस्तभाव

1 Siwaji Kanho's wife of Saswaḍ.
1 Nur Mohamed Gárdi's family at Rozá or Aurangábád.
1 Hari Raghunáth Bhiḍe.
1 Antáji Ráṇe Sawkar of Anandwalli.
1 Achutráo Ganesh of Chándwaḍ.

जेथें असेल तेथें बारकाईनें शोध करून आणून मोजदाद करून बराबर माणसें देऊन मोजदाद जाबतासुद्धां हुजूर पाठऊन देणें म्हणोन, हवालदार व कारकून किले चांदवड निजबत तुकोजी होळकर यास. छ. २१ जिल्काद. सनद १.

परवानगी रूबरू.

आपा लिमया व गोपाळ लिमया शागीर्द यांचें घर मौजे कन्हेले कजब्यांत नेवरें तालुके रत्नागिरि येथें आहे. त्यास हरदू जणाचे घराची जप्ती करून, मुलें माणसें धरून, कैद करून, पक्या बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन, पोटास शिधा मध्यमप्रतीचा देत जाणें; व वस्तभावची जप्ती करून जाबता हुजूर पाठऊन देणें ह्मणून, महिपतराव कृष्ण यास. सनद १.

गंगाराम परदेशी जमादार प्यादे यासी किले चांदवड तालुके शिवनेर येथें अटकेस ठेवावयाबद्दल पाठविला असे, तरी पायांत बिडी घालून पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें म्हणोन, उद्धव विरेश्वर याचे नांवें. छ. १ जिल्हेज. सनद १.

रामचंद्र बाबाजी जोगळेकर यांचें घर वाडा ढोकमळें; कर्यात नेवरें, जिल्हा रत्नागिरि येथें आहे, त्यास याचे घराची जप्ती करून मुलें माणसें कैद करून बंदोबस्तानें अटकेस ठेविणें, आणि पोटास शेर मध्यमप्रत शिधा देत जाणें. वस्तभावेची मोजदाद करून जाबता हुजूर पाठऊन देणें म्हणोन, महिपतराव कृष्ण यास. छ. जिल्हेज. सनद १.

परवानगी रूबरू.

बाबूराव बल्लाळ काणे याची बायको मौजे पालील तालुके सुवर्णदुर्ग येथें पांडुरंग बल्लाळ मोडक याचे घरीं आहे, त्यास तीस कैद करून, किले रसाळगड येथें पक्या बंदोबस्तानें अटकेस ठेऊन, पोटास शिधा मध्यमप्रतीचा देणें; व तिची वस्तभावेची वगैरे जप्ती करून, जाबता लिहून हुजूर पाठऊन देणें; व आबाजी महादेव सोहनी याचीं मुलें माणसें तालुके मजकुरीं गेलीं आहेत, ह्मणून हुजूर विदित जाहलें, त्यास याचा पत्ता बारकाईनें लाऊन जेथें असतील तेथें कैद करून, हरएक किल्यावर अटकेंत ठेऊन, पोटास शिधा मध्यमप्रतीचा देणें. वस्तभावेची वगैरे जप्ती करून जाबता हुजूर पाठऊन देणें म्हणून, मोरो बापूजी तालुके मजकूर याचे नांवें. छ. ३ जिल्हेज. सनद १.

दुसरी सनद दिली सबब हे दूर. परवानगी रूबरू.

आबाजी महादेव सोवनी याची बायको, लक्ष्मण अनंत सबनीस किले घोंसाळा याची कन्या, लक्ष्मण अनंत याचे मेहुणे पांडुरंग बल्लाळ मोडक याचे घरीं मौजे पालील तालुके

1 Appá Limayá & Gopál Limayá ( attendants ).
1 Gangárám Pardeshi Jamádár of peons.
1 Rámchandra Bábáji Joglekar.
1 Báburao Ballál Káne.
1 Abáji Mahádeo Sowani's wife.

र्थे आहे, तीस धरून आणून, किल्ले रसाळगड येथें पक्क्या बंदोबस्तानें अटकेस स शिधा मध्यमप्रतीचा देणें; व तिचे वस्तभावेची वगैरे जप्ती करून, जाबता न देणें; व बाबूराव बल्लाळ काणे याचीं मुलें माणसें तालुके मजकुरीं गेलीं आ- हुजूर विदित जाहलें, त्यास त्यांचा बारकाईनें शोध लाऊन जेथें असतील, ते- आणून, हरएक किल्यावर पक्के बंदोबस्तानें अटकेस ठेऊन पोटास शिधा मध्यम- व वस्तभावेची वगैरे जप्ती करून जाबता हुजूर पाठऊन देणें म्हणोन, मोरो के सुवर्णदुर्ग याचे नांवें. छ. ४ सनद १.

परवानगी रूबरू.

ग गाडदी याचा कबीला जोरावरसिंग हजारी याचे घरीं माहेरास मुल्हेर वीस आहे, तीस वस्तवानीसुद्धां कैद करावी; व बंदोबस्तानें किल्ले मजकुरीं अ- पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देणें; आणि वस्तभावेची मोजदाद करून जाबता हु- देणें ह्मणून, लक्ष्मण विश्वनाथ यासी. छ. ८ जिल्हेज. सनद १.

रसानगी यादी.

राव निकम सरनोबत दिमत पागा हुजूर याजकडे मांत जुन्नर पैकीं गांव तपसील.

१ मौजे चिंचोली तालुके चाकण.

१ मौजे बहुल तालुके पाबळ येथील मोकास बाबेचा अंमल.

---

२

न गांव आहेत, त्यांची जप्ती सरकारांत करून जप्तीची कमावीस तुम्हांस सां- तरी हरदू गांवचा अमल चवकशीनें करून वसूल घेऊन सरकार हिशेबीं जमा व मशारनिल्हेचीं मुलें माणसें मौजे चिंचोली येथें आहेत, ते किल्ले शिवनेरीस याविषयीं उधो विरेश्वर यास अलाहिदा सनद सादर जाहली आहे, तरी तुम्हीं ीं मुलें माणसें कैद करून शिवनेरीस उधो विरेश्वर याजकडे पावतीं करणें ह्म- र हरी याचे नांवें. छ. १९ जिल्हेज. सनद १.

व निकम सरनोबत दिंमत पागा हुजूर याचीं मुलें माणसें मौजे चिंचवली तर्फ जुन्नर येथें आहेत, ते कैद करून तुह्मांकडे किल्ले शिवनेर येथें अटकेस ठेव- बयाविषयीं रघुनाथ हरी यास सनद अलाहिदा सादर केली आहे, त्यास निल्हे तुह्मांकडे पाठवितील ते किल्ले मजकुरीं पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन

---

1 Bahádursing Gárdi's wife, residing at fort Mulher.

1 Jaysingrao Nikam in the service of Sarnobat in Págá Huzur was ordered to be imprisoned.

पोटास शिधा मध्यमप्रतीचा शिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन, उधो विरेश्वर याचे नांवें. छ. १९ जिल्हेज. सनद १.

विसाजी महादेव दात्या निसबत सुमेरसिंग गारदी याचें घर मौजे कोरलें प्रांत राजापूर येथें आहे, त्यास मुलांमाणसांस कैद करून हरएक किल्यावर पक्के बंदोबस्तानें अटकेंत ठेऊन पोटास शेर मध्यमप्रतीचा देणें; आणि वस्तभाव असेल ती जप्तींत ठेऊन, जाबता हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, महादाजी रघुनाथ, तालुके विजयदुर्ग यास. छ. १० मोहोरम. सनद १.

परवानगी रूबरू.

६२–( ४८ ) तालुके पटा येथें अनंतराम व मोहोनसिंग याचें सत्तावीस माणूस खरकसिंग याचे मारफतीचें आहे, त्यास किल्यास परदेशी माणूस ठेवावयाचें नाहीं, तरी याचे ऐवजीं दुसरें माणूस करार करून ठेऊन, याचा हिशेब भरून देऊन रुसकत करणें ह्मणून, बाळकृष्ण केशव तालुके पटा याचे नांवें. छ. २४ जिल्हेज. सनद १.

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल. २२

रसानगी यादी.

६३–( ४९ ) किल्ले आशेर येथें खरकसिंगाचे दिमतीचे माणूस, आसामी ३५ पस्तीस आहेत, ठेवावयाचें नाहीं, तर ते माणूस दूर करून किल्याखालीं उतरून देणें, व त्यास अदा जाला असोन ( असेल ), तो हुजूर लिहून पाठविणें. हुजुरून हिशोब होऊन ऐवजाची सनद तुम्हांस सादर होईल त्याप्रमाणें देणें. या लोकांचे ऐवजीं हुजुरून लोक करार करून पाठविले जातील, त्यांपासून चाकरी घेत जाणें ह्मणून, जगन्नाथ नारायण याचे नांवें. छ. १२ मोहरम. सनद १.

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

परवानगी रूबरू.

---

1 Visáji Mahádeo Dáte in the service of Sumersing Gárdi, ( of Korle, Pargana Rájápur ).

( 62 ) There were 27 Pardeshi men at Taluka Patta. As no Pardeshis were to be kept at forts, these men were ordered to be disbanded.
A. D. 1773-74.

( 63 ) 35 men belonging to Kharaksing, and serving at fort Asher were disbanded.
A. D. 1773-74.

६४-( ५० ) सुमेरसिंग गारदी याचा लेक कजबे शेवगांवास आहे, त्याचा शोध करून जप्त करून ठेवणें म्हणोन पेशजीं तुम्हांस सनद सादर जाली होती, त्याचा जाब तुम्हीं कांहींच लिहिला नाहीं, त्यास असे कामाची सुस्ती तुम्हांपासून व्हावयाची नाहीं असें असतां, हें कसें केलें असेत? त्यास

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

त्याचीं मुलें माणसें पुण्याहून गेलीं, ते कजबे मजकुरीं मणीराम परदेशी सुमेरसिंगाचा व्याही आहे, त्याचे घरीं त्याचीं माणसें गेलीं, त्याजवर पुढें जप्ती होते हें ऐकून शहर औरंगाबादेस माणसें मात्र पळोन गेलीं; परंतु वस्तवानी व मालमवेसी तशीच मणीरामचे घरींच ठेविली आहे, हें वर्तमान हुजूर विदित जाहलें. तुम्हीं जवळ असतां ठिकाण लाविलें नाहींत, तस्मात् गाफिली केली, असोत; या उपरी याची चांगली चवकशी करणें. मणीराम प्रस्तुत इंदुरास होळकराकडे आहे, त्याचा पुतण्या परशराम परदेशी प्रस्तुत शेवगांव कजब्यांत आपले घरीं आहे, तरी पत्र पावतांच त्याजला धरून त्याचे घराची जप्ती करून वस्तवानची मोजदाद करून जाबता हुजूर पाठविणें; व परशरामासही समागमें राऊत देऊन चांगले बंदोबस्तानें हुजूर पुण्यास पाठविणें. सुमेरसिंगाजवळ ऐवज बहुत आहे, तो त्यानें साराच या परदेशीयाचे घरींच ठेविला आहे, यांत गुता नाहीं, तरी तुम्हीं बहुत चांगली चवकशी करून पैका ठिकाणीं लावणें; आणि सविस्तर हुजूर लिहिणें; व परशरामासही बंदोबस्तीनें पाठविणें म्हणून, नरहर लक्ष्मणराव कमाविसदार, परगणे शेवगांव याचे नांवें. छ. १५ मोहोरम. सनद १.

परवानगी रूबरू.

---

( 64 ) The Kamávisdár of Parganá Shewagaum was previously directed to make a search for Sumersing Gárdi's son at Shewagaum, but no reply was received from him. He was reprimanded for his negligence and was addressed as follows:

A. D. 1773-74.

Government is informed that Sumersing's relations on leaving Poona went to Manirám Pardeshi's house at Shewagaum, and that when they learned that a search was being made for them at that place, they went away to Aurangábád leaving their property at Manirám's house. Manirám is at Indore with the Holkar. His nephew is, however, at his house. You should immediately on receipt of this order take him into custody, and send him to Poona, forwarding at the same time a list of the property that may be found in the house. Sumersing had considerable cash with him, and there can be no doubt that it has been kept at the above Pardeshi's house. Very careful inquiry should therefore be made, and detailed report sent to Government.

६५ [अ]–( २३२ ) महिपतराव कृष्ण यास सनद कीं, नारो गणेश फाटक हे तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध गर्दींत सरकारकामास आले, यास्तव याचे मातोश्रीस, व स्त्रीस, व मशारनिल्हेचे भाऊ वेदमूर्ति बाळंभट व सदाशिव गणेश फाटक वगैरे कजबे पावस, तालुके मजकूर, प्रांत राजापूर यांचे कुटुंबाचे योगक्षेमार्थ तालुके रत्नागिरि येथें हरएक गांवीं नूतन इनाम भात जमीन बिघे ५ पांच ध्यावयाचा करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहूप्रमाणें पांच बिघे जमिन हरएक गांवीं चतुःसीमापूर्वक नेमून देऊन आकार होईल तो यांचे नांवें इनाम खर्च लिहीत जाणें; आणि जमिनीची चतुःसीमापूर्वक मोजणी करून हुजूर पाठवणें. त्याप्रमाणें भोगवटियास इनामपत्रें करून दिल्हीं जातील. या सनदेची प्रति लिहून घेऊन हे असल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें म्हणोन. सनद १.

सीत सबैन मया व अलफ साबान २

रसानगी यादी.

[ब]–(२३३) महिपतराव कृष्ण यास सनद कीं, नारो गणेश फाटक हे तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब संनिध गर्दींत सरकारकामास आले, यास्तव याचे मातुश्रीस व स्त्रीस योगक्षेमाबद्दल तालुके रत्नागिरि येथें मशारनिल्हेचे भाऊ बाळाजी गणेश याचे नांवें साल मजकुरीं अवल सालापासून आसामी करार करून, वेतन सालीना खेरीज शिरस्ता निवळ रुपये १५० दीडशें करार केले असेत, तरी चाकरी न घेतां मशारनिल्हेचे घरीं दीडशें रुपये तालुके मजकूरचे ऐवजीं साल दरसाल पावीत जाणें ह्मणोन. सनद १.

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं.

६६–( २४० ) उधो विरेश्वर तालुके शिवनेर यांचे नांवें सनद कीं, चापाजी टिळेकर खिजमतगार हा तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध गर्दींत सरकारकामास आला, यास्तव याचे मुलामाणसांचें चालवणें जरूर जाणून, चापाजी मजकूर याचा लेक हणमंता टिळेकर यास मौ-

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

( 65 ) Náro Ganesh Phátak having lost his life in the attack made by the Gárdis against Peshwá Náráyanrao, five Bighas of land were given for the support of his wife, mother, and brother; an appointment worth Rs. 150 a year was also conferred on the brother; and it was ordered that the salary should be disbursed to him free of service.

A. D. 1775-76.

FROM JANÁRDAN APPÁJI'S DIARY.

( 66 ) Chápáji Tilekar Khismatgár having sacrificed his life in the service of Government, at the time the Peshwá Náráyanrao was attacked by the Gárdis, his son was given one *cháhur* of land in inam at Kumset in Prant Junner.

A. D. 1775-76.

जे कुंभशेत तालुके हवेली प्रांत जुन्नर या लगते गांवीं इनाम जमीन अवल दूम सीम तिहीं प्रकारची चावर १, एक चावर देविली असे, तरी सदरहूप्रमाणें जमीन चतु:सीमापूर्वक नेमून देऊन यांचे दुमाला करून जमिनीचा आकार होईल तो यांचे नांवें इनामखर्च लिहीत जाणें; आणि चतु:सीमापूर्वक मोजणी जाबता लेहून हुजूर पाठवणें, त्याप्रमाणें भोगवटियास इनामपत्रें करून दिल्हीं जातील म्हणून, मशार निल्हे यांचे नांवें. छ. १२ साबान सनद १.

रसानगी, इनामपत्राचे यादीवर देणें जालें असे.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाखर २५

६७–( ३१३ ) बाजीराव आपाजी तालुके धोडप याचे नांवें सनद कीं, सुमेरसिंग याचा मेहुणा नाथूराम वलद संभुनाथ हा पेशजीं लबाडींत होता, सबब सदाशिव बापूजी कमाविसदार परगणे वणदिंडोरी यांणीं कैद करून अटकेस ठेविला आहे, तो तुह्मांकडे पाठवितील, त्यास किल्ले धोडप तालुके मजकूर येथें बेडी घालून पक्या बंदोबस्तानें ठेऊन, पोटास शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें; व त्याचीं मुलें माणसें धरावयाचे शोधांत मशारनिल्हे आहेत, तीं हस्तगत जाहल्यास धरून तुह्मांकडे पाठवितील, त्यांस पक्या बंदोबस्तानें किल्ले मजकुरीं ठेवणें ह्मणोन. सनद १.

परवानगी रूबरू.

६८–( ३१७ ) अबदुल कादर गारदी याचीं मुलेंमाणसें कैद करून तुह्मांकडे किल्ले मजकूर येथें अटकेंत ठेवावयासी. असामी.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाखर २९

२ पुत्र.
२ बहिणी.
१ राख गाडदी मजकूर याची.
१ कुणबीण.
२ लेकी.

८

एकूण असामी आठ पाठविले आहेत, यांस पक्के बंदोबस्तानें किल्यावर अटकेंत ठेऊन सात असामीस पोटास मध्यमप्रतीचा साधा व कुणबिणीस शेर शिरस्तेप्रमाणें देत जाणें

( 67 ) Náthurám wallad Sambhunáth, brother-in-law of Sumersing, having been implicated in the conspiracy was arrested by the Kamavisdár of Wan Dindori. He was now sent to fort Dhodap. Orders had already been issued for the arrest of his family members.

A. D. 1776-77.

( 68 The members of the family of Abdul Kádar were sent to fort Sinhgad for imprisonment.

A. D. 1776-77.

ह्मणोन, गोविंदराव मोरे हवालदार व कारकून किल्ले सिंहीगड याचे नांवें. छ. १९ जमादिलावल. सनद १.

पत्र पुरंधर व परवानगी रूबरू.

६९-( ३२९ ) हणमंता बिन चापाजी टिळेकर यास तालुके शिवनेरपैकीं एक चावर जमीन इनाम, मौजे कुंभशेत तर्फ हवेली मजकूर हा गांव याचे पाटिलकीचा आहे, त्या लगत नेमून देणें ह्मणोन सालगुदस्तां तुह्मांस सनद सादर जाली आहे, त्यावरून मौजे आगरगांवपैकीं जमीन तुह्मीं नेमून देत होतां ते याच्या सोईची नाहीं, यास्तव मौजे सिरोली लंबक तर्फ हवेली शिवनेर येथें सद्रहू एक चावर जमीन नेमून द्यावी ह्मणोन याणें हुजूर येऊन विनंति केली. त्यावरून मौजे मजकूर पैकीं एक चावर जमीन अवल दूम सीम तीन प्रतीची पांच हात पांच मुठींचे काठीनें देविली असे, तरी सदरहू एक चावर जमीन याकडे नेमून देऊन इनाम चालवणें; आणि जमिनीचा चतुःसीमेचा जाबता हुजूर लिहून पाठवणें. त्याप्रमाणें इनामपत्रें करून दिलीं जातील. साल गुदस्तांपासून सदरहू जमीन यास तुह्मांकडून देविली असतां, याचे पदरीं पडिली नाहीं, त्यास हल्लीं एक चावर जमीन नेमून द्याल त्या जमिनीचे आकाराप्रमाणें गुदस्तांचा ऐवज यास देऊन पावल्याचे कबज घेणें; या कामास सरकारचा खिजमतगार पाठविला आहे, त्याचे हु(गु)जारतीनें एक चावर जमीन मोजून याचे पदरीं घालणें म्हणोन, उधो विश्वेश्वर तालुके शिवनेर यांस. सनद १.

सबा सबैन मया व अलफ साबान १०

रसानगी यादी.

## भिवराव यशवंत पानसी याच्या कीर्दीपैकीं.

७०-( ४१३ ) कमावीस जप्तीबद्दल फाजल मशारनिल्हे वगैरे स्वारी राजश्री दादा, रुपये तारापुरांत वस्तभाव सांपडली ते जमा.

सबा सबैन मया व अलफ मोहरम १

२२२। बरहुकूम फाजल मशारनिल्हे गाडदी, तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांस मारावयाचे मेळ्यांत होता, सबब जप्ती केली त्यांत दामिनें सांपडले ते जमा किंमत रुपये, गुजारत बाजी गंगाधर प्रांत बेलापूर. रुपये.

---

(69) Hanmantá bin Chápáji Tilekar whose father lost his life in protecting the late Peshvá was given land in Inam at Kumbshet. As this did not suit him, orders were issued to give him an Inám at Shiroli in Tarf Haveli of Parganá Junnar.

A. D. 1776-77.

(70) Property belonging to Fázal Gárdi and Kharaksing Gárdi, who were among the assassins of Peshvá Náráyanrao, found at Tárápur in Parganá Belápur was attached.

A. D. 1776-77.

२३। पोत गळ्यांतील.

२१ मोत्यें दाणे ३३६, दर रुपयास १६ दाणे.

१। मणी सोनें २०, वजन ॰१ दर १९

१ मोती १

२३।

३३ दुलडी मोत्यांची.

३०॥। मोत्यें सर १०, दर ७ (७४?) प्रमाणें सुमार ७४०

दर रुपयास २४ प्रमाणें.

२ पानडी मधील १

।· मणी सोनें १

३३

४ आंगठी माणकाची १

शहत.

७ माणिकें चुणी.

१ पाच.

किंमत रुपये.

* * *

२३९॥।– बरहुकूम, खरगसिंग तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांस मारावयाचे मेळ्यांत होता सबब. रुपये.

* * * *

७१–( ४५१ ) ताजखान वल्द महमदखान रोहिले दिंमत रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याणीं महमद इसफ गाडदी सरकारचा हरामखोर पळोन जात होता, तो जातीनिशीं मर्दुमी करून धरून आणून दिल्हा, सबब मशारनिल्हे याजवर कृपाळु होऊन परगणा जळगांवपैकीं नूतन इनाम गांव कमाल आकार रुपये १००० एक हजार रुपये याचा द्यावयाचा करार करून हे

सबा सबैन मया व अलफ रबिलाखर २

(71) Tâjkhán wd. Mohammadkhán Rohillá in the service of Raghoji Bhosle, Sena saheb Subhá, with great personal valour captured Mohammad Isaf Gárdi, who acted treacherously towards Government, and was absconding. An Inam village of Rs. 1000 was therefor, ordered to be given to him.

A. D. 1776-77.

लिहीत जाणें; आणि गांव घ्याल तो हुजूर लेहून पाठवणें, त्याप्रमाणें इनाम पत्रें करून दिल्हीं जातील. सदरहू गांव कसबे जळगांवचे लगत नेमून देणें म्हणोन, विश्वासराव रामचंद्र व दामोदर गोविंद कमाविसदार परगणा मजकूर यास. सनद १.

रामाजी अण्णाजी दिंमत नारो कृष्ण यांस कीं हजार रुपयांचा कमाल आकाराचा गांव नेमून देणें म्हणोन. पत्र.

---

२

रसानगी यादी.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं

७२–( ४८१ ) बाळाराम सुमेरसिंग याचा लेक यास किल्ले सिंहगड येथें अटकेस ठेवावयास पाठविला आहे, तरी याच्या पायांत बिडी घालून पक्या बंदोवस्तानें अटकेस ठेऊन पोटास दाळपीठ मिळोन सवाशेर किल्ले मजकूर पैकीं देत जाणें म्हणोन, नारो महादेव याचे नांवें. छ. ९ जमादिलाखर.

समान सबैन मया व अलफ रजब ३०

सनद १.

परवानगी रूबरू.

७३–( ४८२ ) बाळाराम सुमेरसिंग याचा लेक यास किल्ले सिंहगड येथें अटकेंत ठेवावयासी पाठविला, त्यास दाळपीठ मिळोन सवाशेर शिधा द्यावयाविशीं तुम्हांस पेशजीं सनद सादर जाहली आहे, त्यास तो दाळपीठ घेत नाहीं म्हणोन तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें, त्याजवरून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी बाळाराम यास कणीक व दाळ मिळोन सवाशेर व तूप दोन पैसेभार याप्रमाणें सनद पैवस्तगिरीपासून दररोज किल्ले मजकूर पैकीं देत जाणें म्हणोन, नारो महादेव याचे नांवें. छ. २२ जमादिलाखर.

समान सबैन मया व अलफ रजब ३०

सनद १.

परवानगी रूबरू.

---

( 72 ) Bálárám, Sumersing's son, was sent for imprisonment at fort Sinhgad and orders were issued to provide him with flour ( of Jawári or Bájri ) and pulse &c. weighing in all $1\frac{1}{4}$ seer.

A. D. 1777-78.

( 73 ) Bálárám objected to receive the flour given to him. Permission was therefore granted to supply him with wheat flour and ghee.

A. D. 1777-78.

७४-( ५०५ ) वेदमूर्ति बाळंभट बिन गणेशभट, व सदाशिव गणेश, उपनाम फाटक गोत्र कौशिक सूत्र आश्वलायन वास्तव्य कसबे पावस, यांणीं हुजूर किल्ले पुरंदर मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, आपला भाऊ नारो गणेश फाटक हा सन अर्बा सबैनांत कैलासवासी श्रीमंत नारायणराव साहेब यांसंनिध गर्दींत सरकारकामास आला, आपण कुटुंबवत्सल आहों, योगक्षेम चालला पाहिजे, यास्तव स्वामीनीं कृपाळु होऊन कुटुंबाचे योगक्षेमार्थ कांहीं जमीन नूतन इनाम करार करून देऊन चालविलें पाहिजे म्हणोन, त्याजवरून सनसीत सबैनांत पांच बिघे भातजमीन इनाम द्यावयाचा करार करून चतुःसीमापूर्वक नेमून द्यावयाविशीं महिपतराव कृष्ण मामलेदार तालुके रत्नागिरि यास छ. ४ साबान सरकारांतून सनद सादर जाली. त्यावरून त्यांणीं मौजे तोडदे तर्फ हरचिरी प्रांत राजापूर येथें पांच बिघे जमीन नेमून देऊन मोजणीचा जाबता चतुःसीमापूर्वक करून दिला, त्यास जमीन दुमाला होऊन आपणाकडेस चालवितों तेच सालीं तोतयाची गडबड जाली, याजमुळें जमीन आपले दुमाला होऊन चालली नाहीं, त्यास स्वामींनीं कृपाळु होऊन सनसीत सबैनांत पांच बिघे जमीन नेमून द्यावयाविशीं सनद तालुके मजकूर येथील मामलेदारास सादर जाली आहे, त्याचा दाखला दसरचा व मामलेदार मशारनिल्हे यांणीं जमिनीचा मोजणी जाबता करून दिल्हा आहे, तो पाहून त्याप्रमाणें जमीन देववून भोगवटियास इनामपत्रें करून दिल्हीं पाहिजेत म्हणोन, त्याजवरून मनास आणतां त्याचा भाऊ नारो गणेश फाटक हा सन अर्बा सबैनांत तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध गर्दींत सरकार कामास आला, व हे शिष्ट सत्पात्र कुटुंबवत्सल, यांचें चालविल्या(स) श्रेयस्कर जाणोन त्याजवर कृपाळु होऊन पांच बिघे भातजमीन द्यावयाचा करार करून सनसीत सबैनांत महिपतराव कृष्ण मामलेदार तालुके मजकूर यांस सनद सादर केली, त्यास त्यांणीं मौजे मजकूर येथें पांच बिघे जमीन नेमून देऊन मोजणी जाबता करून दिला असतां तोतयाचे गडबडेमुळें जमीन याजकडे चालली नाहीं, हें जाणोन व सुभाचा मोजणीजाबता व दसरचा दाखला यांणीं आणून दाखविला तो पाहून त्याप्रमाणें मौजे मजकूरपैकीं जमीन भातशेत. बिघे.

समान सबैन मया व अलफ सवाल ९

( 74 ) Náro Ganesh Phátak was killed in the assault made on Peshvá Náráyanrao in Arbá Sabain. His brothers Bálambhat and Sadáshiv were therefore granted, in A. D. 1775-76, land measuring 5 bighas. The inam was not however, actually handed over owing to the disturbance of the Imposter. New sanad was now issued confirming the grant previously made,

A. D. 1777-78.

निसबत भाटकर मळे जमीन.
भातशेत दुपिकी बिघे.
॥३॥ ठिकाण नजीक श्री देव सोमेश्वर.
मूळ काठ्या. अर्ज.
१८ १० ८॥
१८॥
पैकीं निमे ९।
काठ्या १६६॥ एकूण.
चतुःसीमा.
१ पूर्वेस वोव्याचा पौड.
१ पश्चिमेस देवाची इनामत.
१ दक्षणेस पाट.
१ उत्तरेस वोढा.
४
पांड साडे आठ.
।-१ ठिकाण कर्दे कृष्णाजी रुद्र फळणकर.
अर्ज १२ कुल १०
काठ्या १२० यांत
चतुःसीमा.
१ पूर्वेस शेत खालीसा.
१ पश्चिमेस धरणाचे नाक्यावरील बांध.
१ उत्तरेस नदी.
१ दक्षणेस देवाची इनामत.
४

किता जमीन बिघे.
८१८४। मळे जमीन.
भातशेत दुपिकी.
निसबत वारपैकीं.
८८३॥ निसबत झिमा गुरव.
८८१॥ प्रत ९ तुकडा ३॥
काठ्या ३१॥ एकूण.
४८२ प्रत ७॥ वसलं ५
काठ्या ३७॥ एकूण.
८८३॥ यास चतुःसीमा.
१ पूर्वेस बांध शेत खालीसा.
१ पश्चिमेस शेत भाटकर खालीसा.
१ उत्तरेस भाटकर शेत खालीसा.
१ दक्षणेस पाटाचा बांध.
४
साडेतीन पांड.

एकूण सहा पांड जमीन.

एकूण पांच बिघे भातजमीन पैकीं सवातीन बिघे अडीच पांड दुपिकी भातजमीन व दीड बिघा अडीच पांड जमीन गिलावस कडधन व सर्दभात येणेंप्रमाणें चतुःसीमा-पूर्वक कुलबाव व कुलकानू हल्ली पट्टी पेस्तर पट्टी देखील हबसी पट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेप सहित, खेरीज हकदार करून इनाम तिजाई सुद्धां दरोबस्त, यास नूतन इनाम करार करून दिल्ही असे, तरी मौजे मजकूर पैकीं सदरहू जमीन त्याचे दुमाला करून

देऊन यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. दरसाल नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या सनदेची प्रति लिहोन घेऊन हे असल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें म्हणोन. पत्रें.

३ सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम मौजे मजकूर.

१ सदाशिव केशव मामलेदार तालुके रत्नागिरि यांस कीं सदरहू पांच बिघे जमीन इनामपत्राप्रमाणें चतुःसीमापूर्वक भटजींचे दुमाला करून देऊन जमिनीचा आकार यांचे नांवें दरसाल इनामखर्च लिहीत जाणें; आणि मागील सनसीत व सब सबैन दुसाला याचे इनामतीचा ऐवज राहिला आहे, तो यांस सुभाहून इतलाख पावता करून हिशेबीं इनामखर्च लिहिणें. तुम्हांस मजुरा पडतील म्हणोन सनद.

---

३

२ येविशीं चिटणिसी पत्रें.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी प्रांत राजापूर यांस.

१ जमीदार तर्फ हरचिरी सुभा प्रांत राजापूर यांस.

---

२

---

५

पांच पत्रें पैकीं तीन सनदा व दोन चिटणिसी पत्रें. रसानगी यादी.

७५–( ९०६ ) सदाशिव केशव तालुके रत्नागिरि यास सनद कीं, बाळाजी गणेश फाटक याचा भाऊ नारो गणेश सन अर्बा सबैनांत तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध सरकारकामास आला, सबब त्याची मातुश्री, व स्त्री, व मशारनिल्हे बंधु यांस योगक्षेमार्थ तालुके मजकूर येथें सनसित सबैनांत अवल सालापासून वेतन खेरीज शिरस्ता सालीना दीडशें रुपये करार करून चाकरी न घेतां वेतन पाववीत जाणें ह्मणोन, महिपतराव कृष्ण माजी मामलेदार मजकूर यांस छ. २ साबानीं सन मजकुरीं सनद सादर जाली, त्यास आसामीचें वतन मशारनि-

समान सबैन मया व अलफ सवाल ९

---

( 75 The allowance of Rs. 150 previously granted to Náro Ganesha's wife, mother, and brother for their maintenance was also ordered to be continued.

A. D. 1777-78.

ल्हेस पावावें, तरी तेच सालीं तोतयाची गडबड जाली याजमुळें सीत व सबा दुसाला वेतन पावलें नाहीं, त्यास मशारनिल्हेचा भाऊ सरकारकामास आला, सबब याची आसामी सीत सबैनापासून वेतन निवळ खेरीज शिरस्ता सालीना रुपये १५० दीडशें चाकरी न घेतां द्यावयाचे करार करून, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सनसीत व सबासबैन दुसाला मिळोन वेतन तीनशें रुपये यास पावते करून साल मजकुरापासून याजपासून चाकरी न घेतां आसामीचें वेतन दरसाल तालुके मजकूरपैकीं दीडशें रुपये निवळ खेरीज शिरस्ता पाववीत जाणें ह्मणोन.

सनद १.

रसानगी यादी.

७६-( ६९४ ) कमावीस जफ्तीबाबत कुशी बुदरूख बटीक सरकार ही कैलासवासी नारायणराव यांच्या दंग्याचे फितुरांत होती, सबब अटकेस ठेऊन सनगें सरकारांत आणविलीं, ते गुजारत राघो विश्वनाथ गडबोले कारकून शिलेदार सनगें. एकूण आंख.

समानीन मया व अलफ जिल्हेज २

२ लुगडें जुनें १
२९ पातळ साधें धुवट १
२५ घटी जनानी १
५ खादी पासोडी १
९॥। चोळखण ५
·। बासन छिटी जुनें १

६७

७७-( ७९९ ) कमावीस जप्ती बद्दल बाळाराम सुमेरसिंग याचा लेक याची वस्तभाव मणीराम नागनाथ याजकडे होती, सबब तुकोजी होळकर यांस लिहिलें होतें, त्याजवरून मशारनिल्हेजवळून वस्तभाव आणवून पाराशर दादाजी याजहस्तें सरकारांत पाठविली, त्यापैकीं कापड जमा गुजारत गंगाधर रघुनाथ कारकून शिलेदार व जीवनराम मदनराम दिंमत मणीराम बरहुकूम आंख पटी छ. १ जमादिलाखर सनगें एकूण चौपट आंख.

सलास समानीन मया व अलफ जमादिलाखर १४

(76) Kushi, a female slave, being implicated in the disturbance which led to Náráyanrao Peshvá's death was sent to prison and her clothes worth Rs. 67 were attached.

A. D. 1779-80.

(77) Property worth Rs. 1970 belonging to Bálárám, Sumersing's son, which was with Manirám Nágnáth was attached by Tukoji Holkar and sent to the Huzur.

A. D. 1782-83.

८९ तिवटें ३
११९ शेले साधे ३॥
११० पासोड्या ताडपत्री २
१२९ शेला जाफरखानी १
३० चिरा जरी १
७२ गजनी १
७९ पीतांबर मर्दानी १
१० झगा धुवट १
९०० रजाई दस्की १
४९० शाला फर्द २, दर २२९
६० छिटें बंदरी ३
२०० तुंबा किनखापी १
१२ हुदा सकलादी १
४० निशाणें ताफ्त्याचीं २
२ बासन छिटी अस्तरें खादी १

१९७०(१८९०) २४॥

७८-(९७२) सुमेरसिंग याचा लेक किल्ले सिंहीगड येथें अटकेंत आहे, त्यास आणविला आहे, तरी दहा प्यादे बरोबर देऊन पक्या बंदोबस्तानें हुजूर पाठवून देणें ह्मणोन, केशवराव जगन्नाथ याचे नांवें. सनद १.

तिसा समानीन मया व अलफ रमजान ११

रसानगी, आनंदराव गणेश बिवलकर.

७९-(१०४६) हणमंता बिन चापाजी पाटील टिळेकर मौजे येखतपूर परगणे सुपें सरकार जुन्नर सुभे खुजस्ते बुनीयाद यांणीं हुजूर कसबें पुणें येथील मुक्कामीं अर्ज केला कीं, माझा बाप चापाजी पाटील टिळेकर श्रीमंत कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध गर्दींत सन अर्बा सबै-

इसन्ने तिसैन मया व अलफ रमजान २३

(78) Sumersing's son, who was under inprisonment at fort Sinhgad, was ordered to be brought to Poona.

A. D. 1788-89.

(79) At the request of Hanmantrao, son of Chápáji Tilekar, who lost his life while defending Peshwá Náráyanrao, he was given the village of Ekatpoor in inam in lieu of a piece of inam land and Pátilki vatan previcusly conferred on him.

A. D. 1791-92.

नांत सरकारकामास आला, यास्तव साहेबीं मेहरबान होऊन मजला मौजे शिरोली बुद्रुक तर्फ हवेली सरकार जुन्नर पैकीं एक चावर जमीन इनाम, व मौजे कुमशेत तर्फ हवेली सरकार मजकूर येथील पाटिलकीचें वतन व वतनसमंधें इनाम जमीन हकदक मानपानसुद्धां सरकारचे होते ते मजला बक्षीस देऊन पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें मजकडे चालत आहे; परंतु माझे सोईची जमीन व पाटिलकीचें वतन नाहीं, तें साहेबीं सरकारांत ठेऊन एक गांव इनाम करार करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन, त्याजवरून मनास आणितां तीर्थरूप कैलासवासी नारायणराव साहेब यांसंनिध याचा बाप सरकारकामास आला, सबब याजला मौजे शिरोली बुद्रुक पैकीं एक चावर जमीन इनाम व मौजे कुमशेत येथील पाटिलकी दिल्ही होती ते याची सोईची नाहीं, सबब सरकारांत ठेऊन याचें चालवणें जरूर जाणोन, याजवरी मेहेरबान होऊन, यास हल्लीं मौजे येखतपूर परगणे मजकूर हा गांव खेरीज बाबतीचा अंमल करून जाहागीर, व मोकासा, व निमचौथाई, व फौजदारी, व सावोत्रा, व सरदेशमुखी कुलबाब कुलकानू हल्लींपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हकदार व कदीम इनाम करार करून, इनाम तिजाईसुद्धां दरोबस्त जल, तरू, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेप सहित, पेस्तरसाल सन सलास तिसैनापासून इनाम सरकारांतून करार करून दिल्हा असे; तर मौजे मजकूर येथील बाबतीचा अंमल खेरीज करून सदरहूप्रमाणें याचे दुमाला करून देऊन यास व याचे लेंकराचे लेंकरीं इनाम चालवणें. दरसाल नवीन सनदेची उजूर न करणें. या सनदेची प्रति लेहून घेऊन हे असल सनद याजवळ भोगवटियास परतोन देणें ह्मणून सनदा व पत्रें.

५ फडणिसी. सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम मौजे मजकूर यांस.

२ मामलेदार यांस कीं, मौजे मजकूर येथील खेरीज बाबतीचा अंमल करून दरोबस्त अंमल कुलबाब कुलकानू खेरीज हकदार व कदीम इनामदार करून इनाम तिजाईसुद्धां पेस्तर साल सन सलास तिसैनापासून इनाम करार करून, भोगवटियास अलाहिदा पत्रें करून दिल्हीं असेत, तरी मौजे मजकूर येथील बाबतीचा अंमल खेरीज करून दरोबस्त अंमल इनामपत्राप्रमाणें पेस्तर सालापासून ढिळेकर मजकूर याचे दुमाला करून देऊन आकार हिशेबीं इनामखर्च लिहीत जाणें ह्मणोन.

१ आनंदराव त्रिंबक सुभेदार परगणे मजकूर कीं, जाहागीर, व मोकासा, व निमचौथाई, व फौजदारी, व सावोत्रा देखील इनाम तिजाईसुद्धां दरोबस्त अमलाचा करार परगणे मजकूरचे हिशेबीं इनाम खर्च लिहीत जाणें ह्मणोन.

१ रामचंद्र नारायण प्रांत पुणें यांस कीं, मौजे मजकूरचा सरदेशमुखीचा अंमल पुणें सुभाकडे कमाविसीनें आहे, तो टिळेकर मजकूर याचे दुमाला करून देऊन आकार प्रांत मजकूरचे हिशेबीं इनाम खर्च लिहीत जाणें ह्मणोन.

---

२

१ कृष्णाजी बल्लाळ मामलेदार तालुके शिवनेर यास कीं, हणमंता बिन चापाजी पाटील टिळेकर यास मौजे सिरोली बुद्रुक तर्फ हवेली सरकार जुन्नर पैकीं एक चावर जमीन इनाम, व मौजे कुमशेत तर्फ हवेली सरकार मजकूर येथील पाटिलकीचें वतन, व वतनसमंधें इनाम जमीन, हकदक मानपान सुद्धां सरकारचे होते, ते बक्षीस देऊन पत्रें करून दिल्हीं त्याप्रमाणें चालत आहे; परंतु जमीन व पाटिलकी टिळेकर याचे सोईची नाहीं, याजकरितां सरकारांत ठेऊन, मौजे इ(ये)खतपूर, परगणे सुपें हा गांव, खेरीज बाबतीचा अंमल करून दरोबस्त पेस्तर साल सन सलास तिसैनापासून इनाम करार करून दिल्हा, सबब इनाम जमीन, व पाटिलकीचें वतन सरकारांत ठेविलें, त्याची बेरीज रुपये.

२८५ इनाम जमीन, मौजे सिरोली पैकीं चावर जमीन.

१३५ पाटिलकीचें वतन, मौजे कुमशेत येथील कित्ता.

---

४२०

चारशें वीस रुपये इनाम जमीन पाटिलकी तालुके मजकुराकडे ठेऊन, सनद तुह्मांस सादर केली असे, तरी पेस्तर सालापासून चौकशीनें आकार करून तालुके मजकूरचे हिशेबीं जमा करीत जाणें ह्मणोन.

---

५

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी, व लेखक वर्तमान व भावी, परगणे मजकूर यांस.

१ देशमुख, व देशपांडे, परगणे मजकूर यांस.

---

२

---

७

एकूण सात सनदा, व पत्रें मिळोन दिल्हीं असेत. रसानगी यादी.

९

मौजे मजकूरचा तनखा देखील सरदेशमुखीसुद्धां बरहुकूम याद. रुपये. ८४४॥

यास तपशील.

३३६॥ जहागीर दरसदे ४० प्रमाणें.

३३६॥ मोकासा व बाबती.

१६८। मोकासा दरसदे २० प्रमाणें.

१६८। बाबती दरसदे २० प्रमाणें.

---

३३६॥।

६७। सरदेशमुखी दरसदे ८ प्रमाणें.

८४ निमचौथाई व फौजदारी.

४२ निमचौथाई दरसदे ५

४२ फौजदारी दरसदे ५ प्रमाणें.

---

८४

२०। सावोत्रा दरसदे २॥ प्रमाणें.

---

८४४॥ एकंदर.

यास गांवचा कच्चा आकार कमाविसदार यांणीं लिहून दिल्हा त्याप्रमाणें.

६५० जमिनीचा आकार.

१०० पेठेचा आकार.

१८ बलुतें.

१६ घरजमा वगैरे.

---

७८४

पैकीं वजा.............................................................रुपये.

२०० गांवखर्च.

९० हक्कदार.

---

२९०

बाकी..........................................................रुपये ४९४

किस्ता..........................................................रुपये ६

५॥≈ मिरासपट्टी तिसरे सालीं घ्यावी, रुपये १७ पैकीं तिसरा हिसा दरसाल.
·।≈ जाजती.

६ ५००

४५४॥। जहागीर, व मोकासा, व बाबती, व निमचौथाई, व फौजदारी, व सावोत्रा.

१९६॥≈ जहागीर.
९८।ॅ मोकासा.
९८।ॅ बाबती.
२४॥ॅ॥ निमचौथाई.
२४॥ॅ॥ फौजदारी.
१२।ॅ सावोत्रा.

४५४॥।·
३९। सरदेशमुखी.
६ मिरासपट्टी तिसरे सालीं घ्यावी, ते दरसाल रुपये ६ सहा प्रमाणें.

५००

पैकीं वजा बाबतीचा अंमल ९८।ॅ रुपये.

बाकी........................................................................४०१॥≈ रुपये.

एकूण चारशें दीड रुपया तीन आणे आकाराचा गांव इनाम दिल्हा असे. पेशजीं टिळेकर मजकूर यास इनाम जमीन व पाटिलकीचें वतन सरकारांतून दिल्हें, तेव्हां पत्रें करून दिल्हीं आहेत, तीं घेऊन सरकारांत ठेवावीं, याप्रमाणें मखलाशीचे यादीवर करार आहे, त्यास टिळेकर याजवळ सनदा व पत्रें होतीं ते दसरीं माघारीं घेतलीं असेत.

४ मौजे सिरोली येथील एक चावर जमिनीबद्दल.

२ सनदा.
१ नांवाची.
१ मोकदमाची.

२

२ चिटणिसी पत्रें, देशाधिकारी; व देशमुख, देशपांडे.

४

कारचें आहे, तें टिळेकर यास बक्षीस दिल्हें आहे, तर याचे हवालीं करून चालवणें. पाटिलकीसंमधें भोगवटियास पत्रें करून द्यावीं, त्यास पेशजीं पाटिलकीचें वतन महमद अलमखान यांणीं सरकारांत नजर केलें, ते समई पत्रें दिल्हीं नाहींत ते घेऊन हुजूर पाठवणें; पत्रें त्याजपाशीं नसलीं तर पाटिलकीसीं आपल्यासीं अर्थाअर्थी संमंध नाहीं; पत्रें पुढें मागें निघालीं तर रद्द असेत; त्याप्रमाणें पत्र घेऊन सरकारांत पाठवणें ह्मणोन पत्र दिल्हें आहे, याजवरून भोगवटियास पत्रें जालीं नाहींत; व टिळेकर याजवळही पत्रें भोगवटियाचीं नाहींत. महमूद अलमखान याचे बेदाव्याचें पत्र होतें तें, व गोत महजर करून घेतला होता, तो माघारा घेतला असे.

१ महमूद अलमखान याचे बेदाव्याचें पत्र सरकारचे नांवें.

१ गोत महजर टिळेकर याचे नांवाचा.

---

२

दोन पत्रें.

---

६

एकूण सहा सनदा व पत्रें, पैकीं महमूद अलमखान याचें पत्र सरकारचे नांवें बेदाव्याचें आहे, तें लाखोटा करून जवाहीरखान्यांत ठेवावयास दिल्हें असे. बाकी पांच पत्रें दप्तरीं ठेविलीं असेत.

---

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

## २ पेशवे, ( ब ) सवाई माधवराव पेशवे.

८०-( २३ ) मिरजा खामबेग वल्लद मौला कुलीबेग, वस्ती कजबे विजापूर, परगणे मजकूर, यास चिरंजीव कैलासवासी राव यांणीं मौजे सारवड, परगणे विजापूर पैकीं जमीन निमचावर एकूण बिघे साठ इस्तकबिल मुशाहिरा द्यावयाचा करार करून राजश्री श्रीनिवास पंडित यांस सालगुदस्त नेमून द्यावयासी सनद नेमून दिली, त्याजवरून त्यांणीं मौजे मजकूरपैकीं सदरहू जमीन नेमून देऊन चतुःसीमेचा जाबता करून दिल्हा आहे, तो पाहून यांणीं सरकारांत बहुत दिवस खिजमत केली, यास्तव त्यांचें चालवणें जरूर जाणून यांजवर मेहेरबान होऊन यांस इस्तकबिल मुशाहिरा जमीन दिल्ही होती, ते हल्लीं नूतन इनाम करार करून दिल्ही. इस्तकबिल मोजणी जाबता थलरामगौडापैकीं जमीन रेगड अवल चावर ॥·

आर्बा सबैन मया व अलफ सवाल २९

यासी चतुःसीमा.

पूर्वेस सिरगिरी बाबद थल, हल्लीं कजबे लिंगाणा मुनवाड १

पश्चमेस मौजे मजकूरचें गाईरान, त्यापुढें कणमुचनहाल येथील शींव १ आहे.

*   *   *   *

येणेंप्रमाणें निमचावर एकूण बिघे ६० साठ बिघे जमीन नूतन इनाम करार करून हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी खातेहक्कदार करून दरोबस्त इनाम चतुःसीमापूर्वक करार करून दिली असे, येविशीं. सनदा, पत्रें.

२ सनदा.

१ नांवाची.

१ गांवास.

२

---

[ 1 ] POLITICAL MATTERS.

Matters relating to

PESHWÁ ( b ) Sawái Mádhavrao.

( 80 ) The late Peshwá is in this sanad referred to as चिरंजीव ( Chiranjiva. )

A. D. 1773-74.

३ चिटणिसी.

१ जमीदारास.

१ कमाविसदार व वर्तमानभावी यांस.

१ श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधी.

३

५ रसानगी

पुण्यांत पेशजीं पत्रें दिलीं आहेत, तीं दप्तरीं बार झालीं आहेत, तीं दूर व बार करणें.

८१-( ३८ ) पुण्याचे वाड्यांत इतबारी लोक रखवालीस ठेविले पाहिजेत किल्ले सातारा येथून शंकराजी नाईक घुले कुलाबकर व लोक यांस हुजूर पाठविणें. आपाजी पायगुडे याजकडील पहिले नेमिले आहेत, ते किल्यावर गेलेच असतील. हल्ली कडील पन्नास लोक नेमिले आहेत, ह्मणजे दोनशें लोकांची भरती जहाली ह्मण शिंदे, व बाबूराव किल्ले सातारा यांस.

आर्बा सबैन मया व अलफ जिल्हेज २९

रसानगी, लक्ष्मण आपाजी कारकून शिं

८२-( ४३ ) महाराज राजश्री छत्रपति स्वामींकडून पेशवाईचीं वस्त्रें घ ताऱ्यास गेले, तेथें वस्त्रें दिलीं, ते समई जवाहीर दिलें, वि दाजी नीळकंठ किंमत रुपये.

आर्बा सबैन मया व अलफ रविलावल १६

जडाव दागिने किंमत रुपये.

१ शिरपेंच, घाट मीनगोर किंमत रुपये ५४७।

शहत.

---

(81) It being necessary to keep trustworthy men to palace at Poona, Nágoji Sinde and Báburao fort were ordered to send Shankaráji Naik Gl bekar and the men of Nandgir serving at the

A. D. 1773-74.

(82) The Peshwá having gone to Satára to receive the office, received along with the clothes, some c a list of which is given in the jamá porti day's diary.

A. D. 1773-74.

१ पाच मदनाईक छपेलु.
३६ हिरे हिरकण्या.
२ पाच किर्डे बाजूस.
६ माणकें चुणी.
१ मोतीं कलमे, रती ५॥

---

४६

१ जगो, घाट साधा किंमत रुपये ४०२
शहत.
३१ हिरवे हिरकण्या.
४९ माणकें चुणी.
१ मोतीं कलमे.

---

८१

१ कंठी, किंमत रुपये ११९२
शहीत.
८ धुगधुगी, किंमत रुपये ११९
१ माणिक मदनाईक.
६ हिरकण्या.
१ मोतीं कलमे.

---

८

५९ मोत्यें माळेस, वजन टाक ४॥।४। चवी १९४ दर ७ प्रमाणें किंमत रुपये. १०५८(१०७८)

---

६० ( मोत्यें ).

१ तुरा मोत्यांचा, समेत दांडी किंमत रुपये १३३२॥।=
४६२ मोत्यें, सर १४ दर ३३ प्रमाणें वजन टाक १६॥१, चवी १९४॥ दर चवीस रुपये ६॥। प्रमाणें किंमत रुपये १३१२॥।=
५ दांडी रुपें मुलामा सोनेरी एकूण किंमत रुपये २०
१ हिरकणी.
१ पाच किर्डा.

४६७

१ तरवार, निमचा घाट साधा किंमत रुपये.

५०६ दरज लोखंडी, त्याजवर जडाव किंमत रुपये.

१३३ हिरे हिरकण्या.

२ हिरे लोलक थोर.

१३१ प्रत हिरकण्या.

१३३

३७२ माणकें चुणी.

१ पाच किर्डी.

५०६

२९ खर्डा १ एकूण लटकता नथणीस किंमत रुपये.

४ हिरे.

२५ चुणी.

२९

४ सोनें शहीत मीनगोर किंमत रुपये.

२ झुबी लटकती नथणीस.

२ आवले.

४

५३९

५

मोत्यें चवकडा मालोल किंमत रुपये.
मोत्यें हुरमोजी रंग, वजन रती २३।।।
एकूण किंमत रुपये २६०० रुपये.
मोत्यें ४

सोनें दूड करण्यास दर तोळा रुपये १९। प्रमाणें रुपये १९।= सोनें वजन तोळे १।.।

सोनें सुमारी दागिने, किंमत रुपये २४७॥-

१ पडदळें मखमली लाल आंत वादी सांबरी, किंमत रुपये १८७॥- रुपये.
कड्यासहित.

२ खंजिऱ्याच्या कड्या थोर, आजमासें तोळे १०

२ माणकेच्या कड्या लहान, एकूण आजमासें तोळे २॥

४ १२॥

२ शिक्का, मोर्तब सोकटी सोन्याची छापे रुप्याची, किंमत रुपये ६०.

१ शिक्का, राजाराम नरपति हर्षनिधान माधवराव नारायण मुख्य प्रधान, सोनें रुपये.

१ मोर्तब लेखन. शिक्का.
सोनें. रुपें.

२ २४७॥-

३

शिक्के दौत तीन पुडी, रुप्याची, वजनी किंमत रुपये भार ६४॥-
एकूण रुपये वजन ६०।= तोळे.

दागिना १.

कट्यार लोखंडी हरजिनसी ताड्यास मुलामा सोनेरी तहमद रुपें, किंमत रुपये ५.

दागिना १.

८३-( ५१ ) वेदमूर्ति महादेव जोशी बिन नारायण जोशी पावसकर यांणीं वैशाख अधिक शुद्ध सप्तमी सोमवारीं पुत्रउत्साह होईल ह्मणोन प्रश्न सांगितला होता, त्याप्रमाणेंच पुत्रउत्साह जाला, सबब त्यांस इनाम जमीन शंभर रुपये सरकारआकाराची देखील इनाम तिजाईसुद्धां दरोबस्त द्यावयाची करार करून हे सनद लिहिली असे, तरी सदरहू प्रमाणें शंभर रुपये आकाराची जमीन प्रांत वाई पैकीं कृष्णातीरीं नेमून देऊन जमीन चालती करणें, आणि चतुःसीमेचा

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

( 83 ) Mahádeo Joshi bin Náráyan Joshi of Páwas had predicted that a son would be born on Vaishákh Adhik Shudha 7th, Monday. The prediction being fulfilled, land worth Rs. 100 was given in inam ( This evidently refers to the birth of Sawái Mádhavrao. ).

A. D. 1790-91.

८४–( ५५ ) चिरंजीव गंगाबाई यांस पुत्र जाहला; या उत्साहास्तव बंदिवान किल्यास आहेत, त्यांपैकीं चिरंजिव राजश्री दादासाहेब यांजकडील प्रकरणाचे पेशजींचे व हल्लींचे असतील, ते तर सोडावयाचे नाहींतच: बाकी दुसरे हुजुरून पेशजीं पाठविले असतील, व तालुके मजकुरींहून ठेविले असतील, त्यांपैकीं भारी अन्यायाचे असतील ते अटकेंत ठेऊन, थोडक्या अन्यायाचे असतील ते सोडून देणें; आणि सोडून दिल्याचा व अटकेंत राहिल्याचा झाडा सबब लाऊन हुजूर पाठविणें ह्मणून, सौभाग्यवती पार्वतीबाई यांचे नांवच्या सनदा.

आर्बा सबैन मया व अलफ रबिलावल २२

१ बाळाजी गणेश, तालुके देवगड.
१ महादाजी रघुनाथ, तालुके विजयदुर्ग.
१ महिपतराव कृष्ण, तालुके रत्नागिरि.
१ कृष्णाजी लक्ष्मण, तालुके अंजणवेल.
१ मोरो बापूजी, तालुके सुवर्णदुर्ग यास कीं सदरहू खेरीज पेशजीं ज्यांणीं सोनाराचा मूल मारिला ते अटकेंत आहेत, त्यांस न सोडणें ह्मणोन सनदेंत लिहिलें आहे.
१ गोविंदराव चिमाजी माणकर, प्रांत राजपुरी.
१ आनंदराव शिंदे, तालुके रेवदंडा.
१ राणोजी बलकवडे, तालुके जयदुर्ग ऊर्फ उंदेरी.
१ गणपतराव कृष्ण, तालुके रायगड.
१ भिकाजी महादेव, तालुके उरण.
१ आनंद रामराव, तालुके साष्टी.
१ वामनाजी हरी, तालुके कल्याण भिंवडी.
१ रामचंद्र खंडेराव, तालुके बेलापूर.
१ दुर्गोजी शिंदे, किल्ले माहुली.

---

(84) Orders were issued in the name of Lady Párvatibái (सौभाग्यवती पार्वतीबाई) to the officers of the various provinces to release prisoners confined for minor offences, in honor of the birth of a son to Lady Gangábái (चिरंजीव गंगाबाई). They were distinctly warned not to release prisoners confined for their connection with Dádásaheb, nor those confined for grave offences.

A. D. 1790-91.

१ भिकाजी गोविंद, मामले कोहाज.
१ रामचंद्र कृष्ण, तालुके वीरवाडी.
१ गणेश त्रिंबक, तालुके अवचितगड.
२ प्रांत वसई.
१ त्रिंबक विनायक.
१ गणजी चंदरराव मोरे, जंजिरे वसई.
१ अण्णाजीराव बोकसे, जंजिरे अर्नाळा.

---

३

१ विसाजी केशव, किल्ले पारनेर.
१ भागोजी बालकवडे, किल्ले डबई.
१ जगन्नाथ नारायण, किल्ले आशेर.
१ बाळकृष्ण केशव, तालुके पटा.
१ कृष्णाजी विश्वनाथ, किल्ले मजकूर दुंढे.
१ बाजीराव आपाजी, तालुके घोडोप.
१ काशी बल्लाळ, तालुके त्र्यंबक.
१ परशराम त्रिंबक, तालुके कावनई.
१ उधो विरेश्वर, तालुके शिवनेर.
१ महादाजी नारायण, किल्ले अहमदनगर.
१ ( २ ) रामचंद्र शिवाजी, यांचे नांवें.
१ किल्ले नारायणगड.
१ किल्ले सोलापूर.

---

२

१ धोंडो महादेव, किल्ले दौलताबाद.
१ आनंदराव भिकाजी, किल्ले कारीगड.
१ रामराव नारायण, तालुके राजमाची.
१ शामराव जगजीवन, किल्ले चंदन, व नांदगिरी, व ताथवडा.
१ जयराम कृष्ण, किल्ले प्रतापगड.
१ नागोजी शिंदे, व बाबूराव कृष्ण, किल्ले सातारा.
१ आनंदराव भिकाजी, किल्ले सिंहगड.

एकेचाळीस सनदा छ. १० सफर. परवानगी रूबरू.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८५ ( ६१ ) पुत्रउत्साह, मातुश्री गंगाबाई यांस पुत्र जाहला, सबब खर्च जाहला तो.
रुपये.

आर्बा सबैन
मया व अलफ
रबिलावल २२

६५३६४८= छ. ६ सफर.

६५१७ पुत्र जाहल्याचें वर्तमान पुरंदराहून आलें, ते समई ब्राह्मणांस भूयसी दक्षणा वांटली ते रुपये.

६४९६ नवे पागेंत, विद्यमान वासुदेवभट कर्वे उपाध्ये.

५२८२ ब्राह्मण असामी ५२८२

१२१४ पुर्व्ये, व गुजराथी, व बायका, मुलें, असामी २४२८, दर ॥ प्रमाणें.

६४९६ ७७१०

२१ वाड्यांतील वगैरे असामी, गुजारत रामाजी काशी वाकनीस ब-

---

### FROM NÁRO APPÁJI'S DIARY.

A. D. 1773-74.

( 85 ) Rs. 7794-3 were expended at Poona on the occasion of the birth of a son to Lady Gangábái. The amount was spent in giving alms to Brahmins, rewards to singers, and musicians, donations to the various deities, feeding the Bráhmins and performing certain religious ceremonies. The details are given in full ( we find in these details the names of all the important deities in Poona then existing, and their destination. ) The festivities commenced on the 6th Safar when news of the birth was received in Poona.

हल यादी. असामी,

१७ वाड्यांतील.

३ आश्रित.

३ हरकारे.

७ शागीर्द.

२ निसबत गोदूबाई देश-मुखीण.

२ पुढचे प्यादे.

१७

५ निसबत नारो आपाजी.

२२

दक्षणा. रुपये.

२० प्रत असामी २० टगे.

१ पुढचे २, दर ॥.

२१

६५१७

१९८= लोक दिंमत हुजूर असामी ३०६ पागेंत ब्राह्मणांचे बंदोबस्तास होते, त्यांस पोस्ताबद्दल दर ८‸ प्रमाणें.

६५३६८=

५० छ. ७ सफर, रवानगी यादी दोन.

९ कसबे पुणेकर महार वोवाळावयास आले त्यांस.

४० कळवातांचे ताफे.

१ अजब कुवर.

१ नूरी रहिमत.

१ सगुणी.

१ पंनाशहरवाली.

---

४

दर ताफेयास रुपये १० प्रमाणें.

९ फेजखान वल्लद अंमलखान, व कालेखान गवई यांस.

---

९०

१४ छ. १० सफर, ब्राह्मणांस भूयसी दक्षणा वांटावयास अधेल्या खरेदी केल्या त्यास बट्टा पडला, तो गुजारत बाळाजी नाईकजी पोतदार अधेल्या सुमार २८०० एकूण रुपये १४०० दर शेकडा रुपये १ प्रमाणें याद.

१४९॥।≈ छ. ११ सफर, देवास दक्षणा वगैरे, गुजारत रामाजी काशी वाकनीस बद्दल याद. रुपये.

१४९८॥ श्रीदेव वास्तव्य पुणें यांसी.

६०।॥ महादेव.

४३।॥ मोहरा नाणें.

१ श्रीनागेश्वर.

१ वृद्धेश्वर, मौजे बांभोर्डे ( भांबुर्डे )

१ देवदेवेश्वर, पर्वतीस.

---

३

दर १४।≈ प्रमाणें.

नक्त. रुपये.

१ सिद्धेश्वर, मंगळवारांतील.

१ केदारेश्वर, सोमवारांतील.

१ त्रिंबकेश्वर, वेऱ्हार आळींतील.

१ केदारेश्वर, गणपतीजवळ.

१ नीळकंठेश्वर, मजमदाराचे घरानजीक.

१ स्वयंभू, दुर्जनसिंगाचे हवेली नजीक.
१ रामेश्वर, शुक्रवारपेठेंतील.
१ काशीविश्वेश्वर, तुळशीबागेंतील.
१ रामेश्वर, योगेश्वरीचे देवळांतील.
१ हरिहरेश्वर, शनवारांतील.
१ पंचलिंग, पुलावरील.
१ अमृतेश्वर.
१ सिद्धेश्वर.
१ ओंकारेश्वर.
१ त्रिंबकेश्वर, बांबवडें यांतील.
१ महादेव, बुधवारपेठेचे विष्णूचे देवळांतील.
१ महादेव, बुधवारांतील.

६०।ॽ

२२।≥ श्रीविष्णु.

१४।≥ विष्णु, वास्तव्य पर्वती यास.

मोहरा. नाणें १ एकूण.
नक्त. रुपये.

१ विठोबा, गंजांतील.

श्रीविष्णु.

१ व्यंकटेश, तोफखान्याजवळ.
१ रामचंद्र, तुळशीबागेंतील.
१ लक्ष्मीनारायण, बुधवारपेठेंतील.
१ वेंकोबा, बुधवारांतील.
१ कृष्णनाथ, अमृतेश्वराचे देवळांतील.

१ कृष्णाजी नाईक दातार याचे धर्मशाळेंतील.
१ विठ्ठल जोती पंताचा.

---

२२।≡
२१।≡ श्रीगणपति.
१४।≡ गांवांतील गणपतीस मोहरा नाणें १.
नक्त. रुपये.
१ गणपति, आदितवारपेठें-तील.
१ सोमवारपेठेंतील नजीक चावडी.
१ शनवारपेठेंतील मातीचा गणपति.
१ वाड्याचे कमाणी दरवाज्या नजीक.
१ योगेश्वरीचे देवळांतील.
१ मोरेश्वर, तुळशीबागेंतील.
१ मोरेश्वर, बुधवारांतील वि-ष्णूचे देवळांतील.

---

२१।≡
२०।≡ हनुमंत.
१४।≡ शनवारपेठेंतील.
मोहर नाणें १
नक्त. रुपये.
१ अमृतेश्वराचे देवळांतील.
१ बुधवारांतील झेंड्यानजीक.
१ रविवारांतील.
१ सोमवारांतील.
१ गणेशपेठेंतील.

१ शुक्रवारांतील.

---

२०।≡

१४।≡ महादोबा, कसब्यांतील यास मोहर नाणें १.

१० कित्ता.

१ बहिरव, कसब्यांतील.
१ पदमोबा.
१ बालोबा मुंज्या.
१ वेताळ, शुक्रवारांतील.
१ शेखसल्ला.
१ शेख साद.
१ बाबदेव.
१ मुंज्या, पार्गेतील.
१ योगेश्वरीचे देवळांतील पिंपळाखालील देव.
१ म्हसोब्या, लकडखान्यांतील.

---

१०

---

१४९८

॥।≈ जागा जागाचे देवांस दक्षणा पाठविली, त्यास विड्याबद्दल पानसुपारीस पाठविले खुर्दा टक्के.

।· भीमाशंकर.
।· विठोबा, पंढरपुरास.
।· योगेश्वरी, आंबे जोगाईचें.
।· भवानी, तुळजापूरची.
।· शंभुमहादेव.
।· त्रिंबकेश्वर.
।· भवानी, वेहरची.
।· गणपति, वास्तव्य पुळें.

·।· सप्तशृंगचे भवानीस.
दर ३।।।६ (?) प्रमाणें.

७२।।।= बारशाचे दिवशीं वाड्यांत ब्राह्मणभोजन जालें त्यास. रुपये.

१९८= खरेदी जिन्नस एकूण.

१६।=दूध वजन ८४।। पक्के, दर ८।१ प्रमाणें.

१।।। आंबे हिरवे कडीस सुमारें ८००

१ भोपळे काळे भाजीस १२ एकूण.

---

१९८=

९३।।। मजुरीखर्च.

९१ स्वयंपाकास आच्यारी वगैरे रोजकरी ठेविले त्यास.

१६ आच्यारी असामी १६ दर १ प्रमाणें.

१८ पुर्णाच्या पोळ्या करावयास असामी ३६

बारशाचे दिवशीं ब्राह्मणभोजन जाहलें त्यास.

मजुरीखर्च रुपये.

स्वयंपाकास आसामी.

रुपये. एकूण.

१२।। पुरण वाटावयास व कणीक तिंबण्यास असामी २०
दर ·।।= प्रमाणें.

४॥ खटपट्ये असामी ९(९), दर
-॥-

---

५१
२॥। उष्टीं काढावयास गुजारत.
हरी. नातु.
निसवत नारो आपाजी. असामी ४२
खुर्दा टके १०॥, दर ३॥।६ प्रमाणें.

---

९३॥।

---

७२॥।≈

---

७३(?)
१ छ. १९ रोज माहे सफर कसबे पुणेकर कुंभा-
रास इनाम रसानगी चिठ्ठी. रुपये.
११३। छ. २१ सफर.
८ मेहेत्रे असामी ४
१ ढवला.
२ ढवळ्या निसबत मोहतर्फा.

---

११
१०२। नामकर्णा निमित्य छ. १६ सफरीं वाड्यांत
ब्राह्मणभोजन जाहलें, त्या[स] दक्षणा पात्रा-
वर दिल्ही, ते ब्राह्मण असामी ३०६८,
दर असामीस खुर्दा रुके ८६ प्रमाणें टके
३८३॥ दर ३॥। टके प्रमाणें.

---

११३।
४५३॥< छ. २३ सफर, जागा जागाचे देवास दक्षणा
पाठविली.
४४७॥< मोहोरा पंचमेळ बरहुकूम पत्र पुरंदर.
नाणें.

७ दिवें श्रीवर्धन येथें बरोबर रामचंद्र कृष्ण भातखंडे.

२ श्रीहरिहरेश्वर व कालभैरव.

१ श्रीउत्तरेश्वर दिवें.

४ श्रीवर्धन येथील.

१ श्रीजीवनेश्वर.

१ श्रीनारायण.

१ भैरव.

१ सोमजाई.

४

७

४ महिपतराव प्रल्हाद कमाविसदार परगणे इंदापूर वगैरे याजवळ दिल्यानें.

१ शंभुमहादेव.

१ योगेश्वरी, आंबें.

१ भवानी, तुळजापूरची.

१ विठोबा, पंढरपूर.

४

८ बाळाजी महादेव कारकून दिंमत नारो आपाजी सुभा प्रांत पुणें या बरोबर.

१ श्रीगणपति, वास्तव्य थेऊर.

१ श्रीमोरेश्वर, वास्तव्य मोरगांव.

१ श्रीफिरंगाई, कुरकुंब.

१ श्रीगणपति, वास्तव्य सिद्धटेक.

१ श्रीमार्तंड, जेजुरीस.

१ श्रीगणपति, रांजणगांव.

१ श्रीभुलेश्वर.

१ श्रीसोमया, करंजें.

---

८

३ कृष्णराव अनंत याजकडे सातारियास पाठविल्या त्यांणीं पावत्या कराव्या, बरोबर लोक चंदनगडकरी तसलमात सदाशिव बाबाजी कारकून.

१ श्रीयेवतेश्वर.

१ श्रीमहाबळेश्वर.

१ श्रीमहालक्ष्मी, कोल्हापुरीं.

---

३

२ भास्कर बल्लाळ याजकडे आनंदवल्लीस पाठविले, त्यांणीं पावत्या कराव्या, बरोबर आवजी धंगाला, व गंगाजी वाईकर प्यादे दिंमत मुदफर्के आनंदवल्लीकर.

१ श्रीत्रिंबकेश्वरास.

१ सप्तश्रृंगचे भवानीस.

---

२

१ श्रीभीमाशंकर, यास तसलमात केसो बल्लाळ चासकर.

२ गोविंद त्रिंबक कारकून दिंमत रामराव नारायण तर्फ राजमाची याजवळ.

१ भवानी, वेहेरची.

१ श्रीबल्लाळेश्वर, पालीस.

---

२

१ श्रीबनेश्वर, यासी लक्ष्मण कृष्ण कारकून याजकडे रवाना, बरोबर रामचंद्र अनंत कारकून दिंमत हुजूर हशम.

१ श्रीवज्रयोगिणीदेवीस, तसलमात हरी कृष्ण कारकून दिंमत त्रिंबक विनायक सरसुभा प्रांत कोंकण.

१ श्रीगणपति, वास्तव्य पुळें यासी तसलमात भास्कर राम कारकून दिंमत महिपतराव कृष्ण तालुके रत्नागिरि.

१ श्रीसिद्धेश्वर, वास्तव्य टोकें यासी तसलमात कृष्णाजी बल्लाळ कारकून नेवासें वगैरे महाल निसबत नारो आपाजी.

---

३१

दर १४।≈ प्रमाणें. रुपये.

६ नक्त दिवे श्रीवर्धन येथील देवास, बरोबर रामचंद्र कृष्ण भातखंडे, रसानगी याद, मुक्काम पुणें. रुपये.

३ श्रीउत्तरेश्वरासंनिधचे देवास.

१ बाबदेव.

१ भैरव.

१ एकवीरा.

---

३

१ श्रीकाळकाई, कारलेकर.

१ स्थानपुरुष, आगर श्रीवर्धन.

१ श्रीकुसबा देवी, आगर श्रीवर्धन.

---

६

---

४९३॥~

१८१॥ किता छ. २३ सफर, वाड्यांत रात्रीवर्गास ब्राह्मण लाविले होते, त्यास इस्तकबिल छ. ७ सफर तागाईत छ. १७ मिनहू रोज ११

बरहुकुम याद गुजारत रामाजी काशी वाकनीस. रुपये.

१६५ रात्रीवर्गाचे ब्राह्मणांस दक्षणा. असामी.

१ भिकजोशी पंचनदीकर.
१ नारायण जोशी.
१ बाळकृष्णभट खरे.
१ बाळंभट पटवर्धन.
१ बापूभट पाळंधे.
१ गंगाधरभट विध्वंस.
१ सदाशिव दीक्षित मालवणकर.
१ आपा जोशी गोलपकर.
१ गोपाळभट दात्ये.
१ बाळदीक्षित वाके.
१ दिवाकरभट माले.
१ बाळकृष्णभट छत्रे.
१ विरेश्वरभट कर्वे.
१ विश्वनाथभट गोडसे.
१ चिंतामणदीक्षित मालवणकर.
१ मथुराभट काशीकर.
१ मोरभट जोगळेकर.
१ आबाभट दांडेकर.
१ महादेवभट वैद्य.
१ रामचंद्रभट केळकर.
१ रघुनाथभट पुरंदरे.
१ जनार्दन जोशी गोळपकर.
१ त्रिंबकभट मराठे.
१ दिनकरभट ढेकणे.
१ परशरामभट दांडेकर.
१ बाबूभट गोखले.
१ विनायकदीक्षित आपटे.
१ नरसा वधाजी ( नरसिंह दाजी? )

१ रामकृष्णदीक्षित बापट.
१ गंगाधरभट टोळ.
१ बाळकृष्णभट पांवसे.
१ जयरामदीक्षित टुल्लु.
१ बाळदीक्षित गडबोले.
१ गोपीनाथभट दातार.

दर असामीस पुतळी १ प्रमाणें ताटे २४ तोळे १०।·।, दरतोळा रुपये १६॥~

११ खरेदी मिठाई पेढे वजन पक्के ॥२ दर ८८२ प्रमाणें.

९॥ दररोज रामरक्षा व मंत्राक्षत पुरंधरास पाठवावयास ब्राह्मण असामी २ ठेविले होते, त्यांचे रोज २२ दररोज रुपये ·।· प्रमाणें.

---

१८१॥

२॥।~ छ. ३० सफर, बारशाचे दिवशीं वाड्यांत ब्राह्मणभोजन जालें, त्यास छ. २६ सफरीं खरेदी पानें द्रोणास एकूण खुर्दा टक्के १०॥।२ दर ३॥।२ प्रमाणें बरहुकुम याद, गुजारत रामाजी काशी वाकनीस. रुपये.

८२॥ छ. ६ रविलावल, हेलकरणी बायकांस द्यावयास लुगडीं खरेदी केलीं, त्यास दर रुपयास नफा ८=॥ प्रमाणें द्यावा, त्यास हल्लीं शिक्का रुपये द्यावयाचे करार करून दर रुपयास अडीच आणे प्रमाणें नफा द्यावा, याप्रमाणें करार केला, त्या बरहुकुम खरेदी लुगडीं एकूण रुपये ११००० एकूण दरसदे रुपये ·॥। प्रमाणें बट्टा पोते चाळीस. रसानगी याद. रुपये.

२ छ. ९ सफर रुजू रविलावल, आपा जिनगर यांणें सरकारच्या वाड्यांत दरवाज्यास तोरण बांधिलें, सबब इनाम. रसानगी यादी. रुपये.

१४।≡ छ. १२ रविलावल, सेखसला पीर पुणें यास पे-

शर्जी एक रुपया ठेविला होता, त्याखेरीज हल्लीं
ठेविली मोहर, नाणें पंचमेळी एकूण. रुपये.

रसानगी याद.

१२० छ. १२ रविलावल, वाजंत्री वगैरे वाद्यांत दहा
दिवस वाजवीत होते, त्यांस बिदाई रसानगी चिटी.

८९ वाजंत्री ताफे यास.

७५ प्रत ताफे ७५ एकूण.

३ प्रत ताफे ६

९ प्रत ताफे ३

२ प्रत ताफा १

८९

१२ होलार ताफे १२

१८ कर्णेकरी असामी ३६

१ तुतारीवाले असामी २

१२०

७७९४८≡

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

८६–( १०६ ) वेदमूर्ति राजश्री महादेव ज्योतिषी बिन नारायण ज्योतिषी पावसकर, गोत्र शांडिल्य, सूत्र आश्वलायन, वास्तव्य कसबे पुणें यांणीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं विदित केलें कीं, श्रीमंत मातुश्री गंगाबाई यां सालगुदस्त सन अर्बा सबैनांत वैशाख शुद्ध सप्तमीस पुत्रोत्साह होईल म्हणोन आपण प्रश्न सांगितला, त्याप्रमाणें घडोन आला, यास्तव आपल्यावरी कृपाळु होऊन कुटुंबाचे योगक्षेमार्थ श्रीकृष्णातीरीं प्रांत वाई पैकीं शंभर रुपये आकाराची जमीन नूतन इनाम द्यावयाचा करार करून चतुःसीमापूर्वक नेमून देऊन जाबता हुजूर पाठवणें, त्या-

खमस सबैन
मया व अलफ
रमजान २९

(86) A piece of land was ordered to be given to Mahádeo Jotishi bin Náráyan Jotishi Pâwaskar, residing at Poona, for his having fore-told that Lady Gangábái would give birth to a son on the 7th Vaishákha Shuddha. The measurements of the inam were now reported by the Mamlatdar of Wâi for confirmation, and the inam was confirmed.

A. D. 1774-75.

बावधन संमत हवेली प्रांत मजकूर पैकीं शंभर रुपये पावणेतीन आणे आकाराची जमीन साडेसवीस बिघे सवाचार पांड नेमून दिली, त्याचा मोजणी जाबता कसबे मजकूरचे मोकदमांनीं करून दिला आहे, तो पाहून त्याप्रमाणें स्वामींनीं कृपाळु होऊन भोगवटियास इनामपत्रें करून दिलीं पाहिजेत म्हणोन; त्याजवरून मनास आणतां यांणीं प्रश्न सांगितला तो घडोन आला, यास्तव यांस कृष्णातीरीं प्रांत मजकूर पैकीं जमीन शंभर रुपये आकाराची नूतन इनाम द्यावयाचा करार करून चतुःसीमापूर्वक नेमून द्यावयाविशीं हैबतराव भवानी शंकर मामलेदार प्रांत मजकूर यांस सालगुदस्त सनद सादर केली, त्याजवरून त्यांणीं कसबे मजकूर पैकीं शंभर रुपये पावणेतीन आणे आकाराची जमीन साडेसवीस बिघे सवाचार पांड नेमून दिली, त्याचा मोजणी जाबता तुम्हीं करून दिला आहे, तो पाहून हे शिष्ट सत्पात्र कुटुंबवत्सल स्नानसंध्यादि षट्कर्माचरण करून आहेत, यांचें चालविल्या, स्वामीस व स्वामीचे राज्यास श्रेयस्कर, हें जाणून यांजवरी कृपाळु होऊन यांस कसबे मजकूर पैकीं बरहुकूम मोजणी जाबता जमीन बिघे.

॰१३।२। तर्फ पिसाळ दर बिघा रुपये ३॥। प्रमाणें रुपये ५०॰-॥। एकूण जमीन. बिघे.

॰७॰३ सेत जानोजी बिन विठोजी पिसाळ, दर बिघा रुपये ३॥। प्रमाणें रुपये २६॥।-

एकूण जमीन बिघे ॰७॰३

यासी चतुःसीमा.

पूर्वेस खंडु दारव याजबद्दल दळा. पश्चिमेस निंबाजी तेली याजबाबत दळा १

दक्षणेस कुबाजी पिसाळ याजबद्दल दळा १ उत्तरेस महाल ओढा कोरडा.

* * * * *

एकूण साडेसवीस बिघे सवाचार पांड जमीन शंभर रुपये पावणेतीन आणे आकाराची सदरहू प्रमाणें चतुःसीमापूर्वक स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा देखील सरदेशमुखी दरोबस्त इनाम तिजाईसुद्धां कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हक्कदार करून जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेप सहित नूतन इनाम यास सरकारांतून करार करून दिल्ही असे, तरी कसबे मजकूर पैकीं साडेसवीस बिघे सवाचार पांड जमीन सदरहूप्रमाणें यांचे दुमाला करून देऊन यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालविणें; दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें; या सनदेची प्रति लेहून घेऊन हे असल सनद ज्योतिषी यांजवळ भोगवटियास परतोन देणें म्हणोन. सनदा, व पत्रें.

२ सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम कसबे मजकूर.

---

२

३ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी, लेखक वर्तमान व भावी, प्रांत मजकूर.

१ देशमुख, व देशपांडे, परगणे मजकूर.

१ हैबतराव भवानी शंकर मामलेदार, प्रांत मजकूर यांस.

---

३

---

५

दोन सनदा, व तीन पत्रें दिल्हीं असत. छ. २६ रमजान.

रसानगी यादी.

८७–( १०७ ) कमाविसभेट राजश्री रावसाहेब यांस अन्नप्राशन संस्कार केला, सबब आहेराबद्दल महिपतराव कृष्ण साठे याजपैकीं जमा, गुजारत येसाजी शेटगा खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

खमस सबैन मया व अलफ रमजान

| | |
|---|---|
| १५ तिवट | १ |
| २० जाफरखानी | १ |
| ३५ | २ |

८८–( १११ ) नानाजी चिंतामण पुरंदरे, जोशी, कुळकर्णी, व देशपांडे, कसबे सासवड यांचे घरीं खासा स्वारी मुहूर्तेकरून गेली होती, सबब मशारनिल्हे यांस नूतन इनाम जमीन बिघे ॥२० वीस बिघे दर बिघा सवा रुपयाचे प्रतीची सासवडानजीक पांच कोशांमध्यें द्यावयाचा करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे, तरी सदरहू वीस बिघे जमीन सवा रुपया बिघ्यास दराची मशारनिल्हेस नेमून देऊन त्याची चतुःसीमा करून जाबता हुजूर पाठवणें, याप्रमाणें इनाम पत्रें करून दिल्हीं जातील म्हणोन, नारो आपाजी याचे नांवें. सनद १.

खमस सबैन मया व अलफ रमजान २१

रसानगी याद.

---

( 87 ) The infant Peshwá having commenced to eat food, a present of clothes was received.
A. D. 1774-75.

( 88 ) The young Peshwá having gone to the house of Nánáji Chintaman Purandare, Joshi, Kulkarni, and Deshapánde of Kasbe Sâswad, on an auspicious day, a grant of inam land was made to the family.
A. D. 1774-75.

मया व अलफ मोहरम २ — र्वतीबाई, पैकीं परवानगी राजश्री सखाराम भगवंत, व बाळाजी जनार्दन फडणीस, विद्यमान सौभाग्यवती पार्वतीबाई, रसानगी व तसलमात बाजी बल्लाळ परांजपे, दर तोळा रुपये १५॥ प्रमाणें, किंमत रुपये ३३६।≡

एकूण सोनें वजन तोळे २१॥=॥, छ. २२ रोज सोनें वजनी दागिना १

९०-( १७८ ) जमा जामदारखाना.

खमस सबैन मया व अलफ सफर ३० — कमाविसभेट बद्दल राजश्री सखाराम भगवंत, राजश्री रावसाहेब यांची स्वारी मुहूर्तें करून बाहेर निघाली, आणि सखाराम भगवंत यांचे घरीं गेले होते तेथें सनगें दिलीं तीं जमा, गुदस्त (गुजारत?) खंडोजी पणदरा खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

१५७ राजश्री रावसाहेब यांस.

| | | |
|---|---|---|
| ५० | चिरा बादली | १ |
| ७५ | वोढणी जरी | १ |
| १२ | मु(तुं?)बा किनखापी | १ |
| २० | झगा बादली | १ |
| १५७ | | ४ |

१०४ मातुश्री गंगाबाई यांस.

| | | |
|---|---|---|
| १०० | साडी शेलारी | १ |
| ४ | खण | १ |
| १०४ | | ६ |

२६१

---

(89) Esubái Sohoni who served as midwife at the accouchment of Lady Gangábái was given for her service a golden chain weighing 21 Tolás and valued at Rs. 336-7 under the orders of Sakhárám Bhagwant and Báláji Janárdan Phadnis.

A. D. 1774-76.

(90) Clothes, presented to the infant Peshwá by Sakhárám Bhagwant on the occasion of his going to the latter's house on an auspicious day, are credited on this date.

A. D. 1774-75.

९१–( १८० ) कमाविसभेट सनगें एकूण किंमत रुपये, राजश्री राव यांचा वर्धापन संस्कार जाहला, सबब गुजारत हरि विश्वनाथ भावे कारकून शिलेदार वाड्यांतील सनगें एकूण. रुपये.

खमस सबैन मया व अलफ रबिलावल ५

२३०॥ बाबत महिपतराव त्रिंबक पुरंदरे सनगें एकूण रुपये.

११८ मातुश्री गंगाबाई यांस.

| | |
|---|---|
| ११५ लुगडीं सनंग | १ |
| ३ खण | १ |
| ११८ | २ |

| | |
|---|---|
| ११२॥ मातुश्री सगुणाबाई यांस लुगडें पैठणी सनंग १ एकूण. | |
| २३०॥ | ३ |

२९ बाबत सखाराम भगवंत.

१९ मातुश्री गंगाबाई यांस.

| | |
|---|---|
| १५ लुगडें साधें | १ |
| ४ खण | १ |
| १९ | २ |

| | |
|---|---|
| १० मातुश्री सगुणाबाई यांस लुगडें साधें सनंग १ एकूण. | |
| २९ | ३ |

२०॥ मातुश्री गंगाबाई यांस, बाबद व्यंकटराव नारायण घोरपडे यापाशीं सनंग एकूण. रुपये.

| | |
|---|---|
| २० साडी शेलारी | १ |
| ·॥· खण | १ |
| २०॥ | |

(91) The Vardhápan ceremony of the infant Peshwá was performed.

A. D. 1774-75.

## जनार्दन आपाजीच्या कीर्दीपैकीं

९२–( २५१ ) नारो केशव बर्वे यांणीं हुजूर विदित केलें कीं, श्रीमंत कैलासवासी नानासाहेब यांच्या अस्तीं आपले जवळ देऊन, श्रीमंत कैलासवासी माधवराव साहेबीं आम्हांस महायात्रेस रवाना केलें; त्यास अस्ती प्रयागीं नेऊन तिरस्थळी यात्रा गया वर्ज्यन करून आल्यावर श्रीमंत रावसाहेबीं आपणांस इनाम जमीन बिघे दहा, मौजे सोनगांव, तालुके सुवर्णदुर्ग, येथें दिल्ही; त्यास इनामाचा ऐवज एक साला सरकारांत द्यावयाचा करार जाला आहे, त्याजवरून मामलेदार आपणाजवळ इनाम जमीनीचा ऐवज मागतात, येविशीं ताकीद जाली पाहिजे म्हणोन; ऐशियास नारो केशव यांणीं सरकारचें महत्कार्य केलें, सबब त्यांचे इनामाचा ऐवज घ्यावयाचा नाहीं, तरी त्यांचे इनाम जमीनीचा वसूल न घेणें. सुदामत चालत आल्याप्रमाणें जमीन मशारनिल्हेकडे चालविणें म्हणोन, मोरो बापूजी तालुके सुवर्णदुर्ग याचे नांवें छ. २९ साबान, चिटणिसी. पत्र १.

सीत सबैन मया व अलफ रमजान ३०

९३–( २९४ ) महादेवभट बिन रामभट, व नागेशभट बिन गंगाधर, भट्ये(?) बिन रामभट, व मोरभट व विठ्ठलभट बिन रामभट, उपनाम पुरंधरे, गोत्र भारद्वाज, सूत्र आश्वलायन, ज्योतिषी व कुळकर्णी, किल्ले पुरंधर यांणीं हुजूर किल्ले मजकूर येथील मुक्कामीं विदित केलें कीं, सन अर्बा सबैनांत शके १६९६ जयनाम संवत्सरीं अधिक वैशाख शुद्ध सप्तमी इंदुवासरीं किल्ले मजकूर येथील माचीस स्वामीचा जन्म जाहला, ते समई श्रीमंत मातुश्री गंगाबाई यांणीं आम्ही समस्त पुरंधरे ज्योतिषी कुळकर्णी किल्ले मजकूर यांस नूतन इनाम जमीनी चावर तीन प्रांत पुणें पैकीं द्यावयाचा करार करून चतुःसीमापूर्वक नेमून द्यावयाविशीं नारो आपाजी यास सनद सन अर्बा सबैनांत छ. २५ सफरीं दिल्ही, त्याजवरून त्यांणीं सदरहू तीन चावर जमीनीपैकीं आपले विभागास जमीन पाव चावर आली, ते मौजे कोंढीत तर्फ करेपठार प्रांत पुणें येथें नेमून

सीत सबैन मया व अलफ सवाल १७

---

(92) Náro Keshav Barve was sent to Prayág by Peshwá Mádhavráo, in charge of the bones of the body of the Peshwá Nánásaheb. He was for this service given 10 bighas of land in inam by Peshwá Mádhavráo.

A. D. 1775-76.

(93) Some land was given in inam to Mahádeobhat and Rámbhat and others surnamed Purandhare, who were the astrologers and Kulkarnis of the fort of Purandhar, in honor of the birth of the infant Peshvá at the fort on Monday the 7th of the bright half of Adhik Vaishákh of Shake 1696. The measurements of the land are given. The rod of measurement was 5 hands and one fist in length.

A. D. 1775-76.

देऊन चतुःसीमेचा जाबता करून दिला असे, त्याप्रमाणें जमीन आपणाकडे चालत आहे, त्यास भोगवटियास इनामपत्रें करून दिलीं पाहिजेत म्हणोन; त्याजवरून मनास आणितां हे शिष्ट सत्पात्र कुटुंबवत्सल, यांचें चालविल्यास राज्यास श्रेयस्कर, हें जाणोन त्यांजवर कृपाळु होऊन तीर्थरूप मातुश्री गंगाबाई यांणीं आमचे जन्मकाळीं हे समस्त पुरंधरे ज्योतिषी व कुळकर्णी किल्ले मजकूर यांस नूतन इनाम जमीन चावर तीन प्रांत मजकूर पैकीं द्यावयाचा करार करून चतुःसीमापूर्वक नेमून द्यावयाविशीं नारो आपाजी यास सनद सन आर्बा सबैनांत छ. २९ सफरीं सादर केली, त्याजवरून त्यांणीं तीन चावर जमीन चतुःसीमापूर्वक नेमून दिली, त्यापैकीं याचे विभागास जमीन आली ती मौजे मजकूर येथें पांच हात एक मुठीचे काठीनें मोजून देऊन चतुःसीमापूर्वक जाबता सुभाहून करून दिला आहे, तो पाहून त्याप्रमाणें थळ करजाळे पैकीं जमीन बिघे.

८२९॥= प्रत मोजणी.

८९।॥१॥ कित्ता.

| तुळ काठ्या. | अर्ज काठ्या. | |
|---|---|---|
| ६३ | ३१ | ४०। |
| | ३८ | |
| | ११० (१०९।?) | |

पैकीं तिजाई, पावणेसहा बिघे दीड पांड.

प्रत मोजणी.

८२३॥।॥ कित्ता मोजणी.

| तुळ काठ्या. | अर्ज काठ्या. | |
|---|---|---|
| २३२ | ३८॥। | ४१॥। |
| | ४२ | ४१ |
| | ४० | ० |
| | २०३॥ | |

पैकीं पांचवा हिसा, काठ्या ४१

पावणेचवीस बिघे अर्धा पांड.

---

८२९॥=

साडेएकुणतीस बिघे दोन पांड, यास चतुःसीमा.

पूर्वेस शेत गोंदजी पाटील खैरे मौजे पश्चिमेस शेत भवानजी पाटील खैरे

मजकूर १ मौजे मजकूर.

दक्षणेस पाणंद. उत्तरेस मौजे चांबळी तर्फ करेपटार येथील सींव १

८।·३ प्रत मोजणी, मळई नजीक वोढा करजाळे.

तुळ काठ्या. अर्ज काठ्या.

२० ८

आठ पांड जमीन संताजी जाधव याचे शेतपैकीं यास चतु:सीमा.

पूर्वेस वोढा थळमजकूर १ पश्चमेस ओढा थळमजकूर १

उत्तरेस बांध थळमजकूर १ दक्षणेस ओढा थळमजकूर १

·।·

एकूण जमीन पाव चावर अवल दुम सीम तिही प्रतीची चतु:सीमापूर्वक स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा दरोबस्त देखील सरदेशमुखी व इनाम तिजाई सुद्धां कुलबाब कुलकानू हल्लीं पट्टी पेस्तर पट्टी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधिनिक्षेप सहित खेरीज हक्कदार करून नूतन इनाम यास सरकारांतून करार करून दिली असे, तरी सदरहू जमीन यांचे दुमाला करून देऊन यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालविणें. प्रतिवर्षीं नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रति लिहून घेऊन असल पत्र भोगवटियास भटजींजवळ परतोन देणें म्हणोन. येविशीं पत्रें.

२ सनदा.

१ नांवाची सनद कीं, तुह्मी सदरहू जमीन आपले दुमाला करून घेऊन इनाम अनुभवून सुखरूप राहणें ह्मणोन.

१ मोकदम मौजे मजकूर यास.

२

२ चिटणिसी पत्रें.

१ देशाधिकारी, व लेखक वर्तमान भावी.

१ जमीदार प्रांत मजकूर यास.

२

४

चार पत्रें. रसानगी यादी.

९४-( ३०९ ) सरकारांत कुही शेळीचें प्रयोजन आहे, तरी एक शेळी तांबडी अगर काळी चांगली दुधाची खरेदी करून पाठवणें; या रंगाची न मिळेल तरी पांढरी चांगली शेळी दुधाची एक खिजमतगार सरकारचा पाठविला आहे याजबरोबर जलद पाठऊन देणें म्हणोन, आनंदराव काशी कमाविसदार कोतवाली शहर पुणें याचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाकर ८

९५-( ३५७ ) जमा जामदारखाना.

सबा सबैन मया व अलफ जिल्काद २६

कमाविसभेट सनगें एकूण किंमत रुपये.

३६८॥ मातुश्री गंगाबाई यांची स्वारी पुण्यास गेली होती, तेथें सनगें आलीं तीं जमा, गुजारत खंडोजी पणदरा खिजमतगार सनगें एकूण किंमत रुपये.

२६५ बद्दल राघोजी आंगरे.

| | | |
|---|---|---|
| २५० | लुगडें पैकीं | १ |
| १५ | खण पैठणी | १ |
| २६५ | | २ |

३१ बद्दल महिपतराव कृष्ण.

| | | |
|---|---|---|
| ३० | लुगडें | १ |
| १ | खण | १ |
| ३१ | | २ |

३१ बद्दल बाळाजी हरी साठे.

| | | |
|---|---|---|
| ३० | लुगडें | १ |
| १ | खण | १ |
| ३१ | | २ |

२५॥ बद्दल विनायकभट थथे.

| | | |
|---|---|---|
| २५ | साडी शेलारी | १ |
| ·॥· | खण | १ |
| २५॥ | | २ |

( 94 ) A milch she-goat of the कुही kind, either red or black, was ordered to be purchased at Poona for Government.
A. D. 1776-77.

( 95 ) Lady Gangábai received clothes from Rághoji Ángriá and others when she had gone to Poona.
A. D. 1776-77.

| | | |
|---|---|---|
| | १६ बद्दल गोविंद भटजी जवनरे. | |
| | १९ लुगडें | १ |
| | १ खण | १ |
| | १६ | १(२) |
| ३६८॥ | | १० |

१६९ राजश्री सखाराम भगवंत यास बद्दल राघोजी आंगरे, गुजारत मल्हारजी कामथे खिजमतगार दिंमतगार दिंमत मजकूर.

| | | |
|---|---|---|
| | २९ तिवट | १ |
| | ६० शेला जाफरखानी | १ |
| | ३० किमखाप | ·॥· |
| | ५० महमुद्या | २ |
| | दर २९ | |
| | १६९ | १४॥ |
| ९३३॥ | | |

९६–( ३७० ) मातुश्री सगुणाबाई मौजे वडुतास श्रीकृष्णातीर जाऊन राहतात, सब तेथील बेगमी करून देण्याविशीं. सनदा.

सबा सबैन
मया व अलफ
जिल्हेज ५

१ कृष्णराव अनंत याचे नांवें पत्र कीं, मौजे वडुत येथील बाग सरकारची आहे, मातुश्रीकडे देविली असे ती देणें, व सातारेयाचे बागेपैकीं फुलें, व बेल, तुळसी, व खाजी भाजी, व केळीचीं पानें कार्याकारण दररोज देविलीं असेत; लि हिले प्रमाणें पावतीं करीत जाणें; व चौकीच्या बंदोबस्तास सातारेयापैकीं प्या असामी १५ पंधरा नेहेमीं देविले असेत, नेमून देणें म्हणोन. सनद.

१ शामराव जगजीवन याचे नांवें पत्र कीं, चौकीपहाऱ्यास तुम्हांकडून प्यादे बेरड मिळोन असामी १० दहा ठेविले असेत, तरी किल्ले चंदन, व किल्ले नांदगि पैकीं रोजकर यांची बेगमी करून नेहेमीं नेमून देणें म्हणोन. सनद

(96.) Mátushri Sagunábai being desirous of residing at Vaḍuth, on the banks of the Krishná, provision was made for her residence at the place.

A. D. 1776-77.

१ सदाशिव गोविंद याचे नांवें सनद कीं, मातुश्री यांचे स्वारीबरोबर घोडीं, व उंटें, व गुरें तेथें राहतील त्यांस सहा महिन्यांचे बेगमीबद्दल आजमासें गवत पुले सुमारें ७०,००० सत्तर हजार गवत सातारेयाचे कुरणपैकीं देविलें असे, तरी गंजी पैकीं देणें म्हणोन. सनद.

३

तीन पत्रें. रसानगी यादी.

९७–(४०४) भवानी शंकर हैबतराव यास सनद कीं, मातुश्री सगुणाबाई मौजे वडुत येथें नेहेमीं रहावयास जाणार, त्यास मौजे मजकुरीं सरकारचा वाडा आहे, तेथील तक्तपोशी जाहली नाहीं, व मोऱ्यांची वगैरे सोय नाहीं, सबब हरि जिवाजी सांगतील त्याप्रमाणें तुम्हांकडील कारकून कामावर ठेऊन प्रांत वाईपैकीं तीन चारशें पावेतों रुपये लाऊन काम लौकर करून देणें म्हणोन. सनद १.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ४

परवानगी रूबरू.

९८–(४०७) कमाविस राजश्री रावसाहेब यांचें चूडाकर्म जालें, सबब आहेर आले ते जमा इस्तकबिल छ. ७ मोहरम तागाईत छ. ८ मिनहू सनगें सुमारें.

सबा सबैन मया व अलफ मोहरम ८

४ सखाराम भगवंत.
४ बाळाजी जनार्दन फडणीस.
४ विश्वासराव येशवंत पानसे.
८ जनार्दन आपाजी.
४ गोपाळ संभाजी.
४ मोरो हरी.
४ बगाजी गोपाळ देशपांडे.
६ बाळाजी नाईक भिडे.
४ सर्वोत्तम शंकर.
४ शिवराम रघुनाथ निसबत खासगी.

---

(97) Orders were issued for repairing the Government building at Vaduth to make it convenient for the residence of Mátushri Sagunábai, who intended to go there.

A. D. 1776-77.

(98) Presents were received from Sakhárám Bhagwant, Báláji Janárdan Fadnis, Vishwásrao Yeshwant Pánse, and many other officers, on the occasion of the चूडाकर्म (tonsure ceremony) of the Peshwá.

A. D. 1776-77.

८ हरि पुरुषोत्तम पटवर्धन.
४ कोंडाजी नाईक चिटा कोळी.
८ गणपतराव भिकाजी रास्ते.
३ नारो बल्लाळ मुसकुटे.
२ फत्तेसिंग गाईकवाड याजकडील वकील.
२ दिपाजीराव यरुणेकर.
६ कृष्णराव बल्लाळ काळे.
६ सुबराव वकील, दिंमत मुराररराव घोरपडे.
४ भिकाजी विश्वनाथ जकाते प्रांत पुणें.
९ भवानराव प्रतिनिधी.
५ गोविंदराव गाईकवाड याजकडील वकील.
४ वेंकोजी माणकेश्वर पोतनीस.
४ बाळाजी शंकर निसबत फरासखाना.
२ गंगाधर गोविंद पटवर्धन.
४ महिपतराव कृष्ण साठे.
४ माधवराव सदाशिव जाधवराई.

१२१ २६

एकूण आंबाचे निमे किंमत. रुपये.

२१९ चिरेबादली.

| | | | |
|---|---|---|---|
| १९ | १९ | २० | ५० |
| ३० | ४९ | ४० | ० |

२१९ ७

२० तिवट छिटी बऱ्हाणपुरी २, दर १०

२७४ तिवटें.

| | | | |
|---|---|---|---|
| ७॥ | १० | १२॥ | १० |
| १२॥ | १२॥ | १२॥ | ९ |
| ५ | ६ | ७॥ | ७॥ |
| ७॥ | ७॥ | १० | ८॥ |
| १० | ७॥ | ३९ | २५ |
| ५०॥ | ० | ० | ० |

२७४ २१

२२१२।≈ शिल्लक रोजगुदस्त नक्त.

५९॥ जमा, छ. मजकूर तसलमात कृष्णाजी उगला, जामदार पैकीं खर्च मुळें जमा, मोहरा नाणें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ४०॥ | अलमशाई | ३, दर १३॥ |
| १९ | सुरती | १ |
| ५९॥ | | ४ |

२२६७॥≈

९९-( ४२१ ) मौजे कोपरगांव, परगणा कुंभारी येथें गंगेचे बेटांत श्रीशुक्लेश्वराचे देवालयासंनिध सन इसने सबैनांत सरकारचा वाडा व बाग नवा केला, तेथें बेट मजकुरीं पेशजींपासून जमीन इनाम चालत आहे, त्यापैकीं वाडा व बागेकडे जमीन घेतली, याची चौकशी बापूजी कृष्ण कारकून निसबत खासगी यांणीं केलियाप्रमाणें हल्लीं सरकारांतून मोबदला दुसरी जमीन मौजे मजकूर येथील बेट पैकीं जमीन बिघे.

सबा सबैन मया व अलफ मोहरम २०

८३॥८४ श्रीशुक्लेश्वराकडील इनाम पैकीं घेतली, तिचे मुबदला हल्लीं दुसरी जमीन बिघे साडे तीन व काठ्या ४

८६८४८४ मसीदीकडे चिराख बत्तीबद्दल इनाम चालत आहे, त्यापैकीं जमीन घेतली, तिचे मुबदला हल्लीं दुसरी मसीदीकडे सा बिघे चार पांड चार काठ्या जमीन.

८९॥४।३

एकूण साडे नऊ बिघे सवाचार पांड तीन काठ्या जमीन, हल्लीं सरकारांतून सदरहूप्रमाणें दुसरी जमीन पेशजींप्रमाणें सालमजकुरापासून इनाम करार करून देऊन, हे सनद सादर केली असे, तरी पेशजींपासून जमीन इनाम चालत आहे, त्याप्रमाणें हल्लींची सदरहू साडेनऊ बिघे सवाचार पांड तीन काठ्या जमीन, इनाम दरसाल चालवणें ह्मणून. सनदा.

२ कमाविसदार वर्तमान व भावी यांस. सनदा.

( 99 ) A Government house was built at Kopargaum in Pargaṇá Kumbhári in a piece of land situated in the bed of the Godávari near the temple of Shukleshvar in A. D. 1771-72, and a garden was laid out at the place. Land was for those purposes taken from the inams of Shukleshvar and a mosque; and other land in exchange was given to the temple and the mosque.

A. D. 1776-77.

१ श्रीशुक्लेश्वराचे जमीनीविशीं.
१ मसीदी बेट मजकुरीं आहे, तेथील चिराख बत्तीबद्दल जमीनीविशीं.

२

२ हल्लींचे कमाविसदार आत्माराम रंगनाथ, व आत्माराम राजाराम परगणा मजकूर यांस कीं सदरहूप्रमाणें जमीन इनामखर्च लिहीत जाणें म्हणून. सनदा.
१ श्रीशुक्लेश्वराचे जमीनीविशीं.
१ मसीदीकडे जमीन चालवणें म्हणोन.

२

४

रसानगी यादी.

१००-( ५०४ ) २०० वाड्यांतील कारकून, शिलेदार, वगैरे यांस कैलासवासी गंगाबाई यांचे सुतकांत राजश्री राव याजवळ चाकरीस होते त्यांस बक्षीस. रसानगी यादी.

समान सबैन मया व अलफ सवाल ८

कापड आंख ५०० पांचशें देविलें, त्यास जामदारखान्यांत कापड मिळालें नाहीं, सबब अडीचपट नक्त रुपये.

७२ कारकून शिलेदार.
३६ महादाजी विश्वनाथ जोशी, आंख ९० रुपये.
३६ गोपाळ कृष्ण जोशी, आंख ९० एकूण.

७२

२० रामचंद्र विष्णु मराठा आचारी, आंख ५० एकूण.
२८ सदाशिव शिवराम परांजप्या हरकारा ब्राह्मण, आंख ७० एकूण.
२० रामचंद्र विश्वनाथ गोखला शागीर्द, आंख ५० रुपये.
२० माणकोजी आढाव न्हावी, आंख ५० एकूण.
४० खिजमतगार आसामी ६, एकूण आंख १०० रुपये.

(100) Clothes worth Rs. 500 were given to Karkoons, Silledars and others who had charge of the infant Peshwá while in mourning for the death of Gangábai.

A. D. 1777-78.

६॥। बाबाजी पडक १७

६॥। खंडोजी पणदरा १७

६॥। जानोजी चव्हाण १७

६॥ बाळोजी वागमारा १६

६॥ जिवाजी काटकर १६

(६॥। ....................१७?)

४० १०(१००)

२००

रसानगी, खंडोजी पणदरा खिजमतगार. रुपये.

१०१–( ५९८ ) कमाविसभेट, सनगें एकूण. रुपये.

तिसा सबैन मया व अलफ रविलाखर १

३७॥ राजश्री राव यांचे मृ(व्र)तबंधाचे आमंत्रणास बाळाजी जनार्दन फडणीस पुण्यांत गेले होते, त्यांस सनगें आलीं, तीं गुजारत मल्हारजी ठकगीरा खिजमतगार सनगावर चौपट प्रमाणें आंख घालून त्यापैकीं चौथाई किंमत जमा. रुपये.

१० प्रसाद श्रीगणपति कसबे पुणें तिवट १

२७॥ बरहुकूम जनार्दनभट शालग्राम.

१२॥ तिवट १

१५ जाफरखानी १

२७॥ २

३७॥

० लंग.

३७॥

(101) Bálájí Janárdan Fadnis had gone to Poona to give invitations for the thread-ceremony of the Peshwá.

A. D. 1778-79.

मया व अलफ
सबिलाकर ९

पुण्यास आली तसमई.

१॥ घटिकास्थापन केलें त्यास दक्षणा.

·॥· गणपतीस.

१ घटिकेस.

१॥

४२ ग्रहप्रीत्यर्थ दानें दिल्हीं त्यास दक्षणा.

१० रविप्रीत्यर्थ.

५ माणिकदान महादेवभट भाव्ये वरसईकर यांस दिलें त्यास दक्षणा.

५ आरक्तवस्त्र देणें बाजीभट केळकर.

१०

१० भौमप्रीत्यर्थ.

५ प्रवालदान देणें बाळंभट पेंडसे.

५ सुवर्णदान देणें बाळंभट वैद्य वरसईकर.

१०

११ शनिप्रीत्यर्थ.

५ तिलदान देणें कृष्णंभट गोखले.

६ कुळीथ देणें बापूभट नाशि[क]कर.

११

११ केतुप्रीत्यर्थ.

६ कस्तुरी देणें अनंतभट फाटक.

---

(102) Alms were given to Brahmins, and offerings were sent to deities both Hindoo and Mohamedan, on the occasion of the Peshvá's entering the palace at Poona. The Peshvá entered through the Delhi gate and then passed through

A. D. 1778-79.

2 inner doors.

९ शास्त्रदान देणें चिमणभट केळकर.

११

४२

६ तिथिप्रीत्यर्थ तांदूळदान देणें बाळकृष्ण दीक्षित काशीकर.

५ मुहूर्तेंकरून निघते समईं घरचे देवास दक्षणा.

६६ वाड्यांत प्रवेशसमईं खर्च.

१५। थोरले देवघरांतील देवास दक्षणा. मोहर नाणें १

५०॥। पुण्याहवाचन केलें ते समईं.

१ गणपतीस दक्षणा.

४ कलशास, कलश २

२ हिरण्यार्थ, दर १

२ पुण्याहवाचन कलशास दक्षणा, दर १

४

४ शिवा प (आपः) संतु, ब्राह्मण असामी ८, दर ·॥·

२६॥ भूयसी दक्षणा शिष्ट ब्राह्मणांस असामी ५३, दर ·॥·

१५। सौभाग्यवती दुर्गाबाई वोवाळावयास आली त्यास वोवाळणी घातली, मोहर नाणें १

६६

४९ गांवांतील वगैरे देवांस दक्षणा पाठविली, गुजारत महादाजी विश्वनाथ जोशी.

रुपये.

७ पर्वतीचे देवांस.

१ देवदेवेश्वरपंचायतनसुद्धां

१ देवदेवेश्वरास.

१ सूर्यनारायणास.
१ गणपतीस.
१ देवीस.
१ कार्तिकस्वामीस.
१ विष्णूस.

---

६

१ श्रीविष्णूस.

---

७

१ नवलाखे, पर्वतीचे तळ्यावरील यास.
१ व्यंकोबा, तोफखान्याजवळील.
१ श्रीरामेश्वर, पुण्यांतील.
१ विष्णु, बुधवारांतील.
१ श्रीरामचंद्र, तुळशीबागेंतील.
१ श्रीयोगेश्वरी, बुधवारांतील.
१ गणपति, गांवांतील.
१ श्रीओंकारेश्वर.
१ श्रीअमृतेश्वर.
१ श्रीसिद्धेश्वर.
१ श्रीकेदारेश्वर.
१ श्रीनागेश्वर.
१ श्रीहरिहरेश्वर.
१ श्रीसोमेश्वर, स्वयंभू रविवारांतील.
५ हणमंतास.
  १ शनवारांतील.
  १ बुधवारांतील.
  १ शुक्रवारांतील.
  १ गणेशपेठेंतील.
  १ मंगळवारांतील.

---

५

१ मातीचे गणपतिस.
१ वेताळ, गुरुवारांतील.
१ नीळकंठेश्वर, मजमदारांचे घराजवळील.

१ बालोबा, काले ( काळी ) तील.
१ महादोबादेव.
१ पदमोबा, कसब्यांतील.
१ बहिरोबा, कसब्यांतील.
१ ह्मसोबा, लकडखान्याजवळील.
१ वाबदेव, कसब्यांतील.
१ गणपति, गणेशदरवाज्याजवळील.
१ मुंजाबा, हुजूरपागेंतील.
५ सभोंवतालचे गांवचे देवांस पाठविले.
१ श्रीवृद्धेश्वर, भांभवड्यांतील यास.
१ गणपति, गणेशखेंडींतील.
१ सोमेश्वर, पाषाणचा.
१ विठोबा, विठ्ठलवाडीचा.
१ बहिरोबा, वानवडीचा.

५

४५(४४)

१० सवाष्णी ब्राह्मणबायका, दीप, व पूर्णकुंभ घे-
ऊन उभ्या होत्या, त्यांस चोळी लुगड्या-
बद्दल. रुपये.
५ सौभाग्यवती सखुबाई करवी, दीप
घेऊन उभी होती त्यांस.
५ सौभाग्यवती विठाबाई अनगळीण,
पूर्णकुंभ घेऊन उभी होती त्यांस.

१०

१७९॥(१७४॥)

३८॥। कुणबिणीस चोळीलुगड्याबद्दल स्वारी वाड्यांत मुहूर्तेंकरून आली, ते स-
मई घागरी वगैरे घेऊन उभ्या होत्या त्यांस. असामी.



६ पाण्याच्या घागरी घेऊन उभ्या होत्या त्यांस.

२ दिल्लीदरवाज्यांतील.

१ यमुनी.

१ शेवती.

---

२

२ मधल्या दरवाज्यांत.

१ लवंगी.

१ राणी.

---

२

२ माजघरच्या दरवाज्यांत.

१ पाची.

१ सगुणी.

---

२

---

६

३ दहींभात घेऊन उभ्या होत्या त्या असामी.

१ घोंडी, दिल्लीदरवाज्यांत.

१ चापी, मधल्या दरवाज्यांत.

१ माजघरचे दरवाज्यांत अंबरी.

---

३

१ कृष्णी, मीठ महुऱ्या घेऊन उभी होती.

---

१०

रुपये.

३५ लुगड्याबद्दल दर असामीस रुपये ३॥ प्रमाणें.

३॥। खणाबद्दल दर असामीस ।≈ प्रमाणें.

---

३८॥।

२ खैरातखर्च विषयीं राजश्री रावसाहेब मुहूर्तेंकरून पर्वतीहून स्वारी पुण्यास आली, ते समई पिरास पाठविले. रुपये.

२

·।· खासगत खेरीज जिन्नस राजश्री राव यांजकडे.

-।=॒ लाह्या बारीक साळीच्या कैली ८८२।।।·

८- जानवीजोडा सुमार १

·।·

२१६।।।· (२१५।।।)

तपशील.

३०॥ मोहरा नाणें २ दर १५।·

१८६।( १८५। ) नक्त.

२१६।।।· ( २१५।।। )

१०३–( ६०६ ) कमाविसभेट सनगें एकूण. रुपये.

सिसां सबैन मया व अलफ रबिलाकर.

२०५ बरहुकूम संस्थान भूपाल याजकडून वस्त्रें आलीं, तीं राजश्री राव यांस, गुजारत जानोजी जाबक खिजमतगार सनगें एकूण आंखाची चौथाई किंमत जमा. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ५० | चिराबादली | १ |
| ५० | शालफर्द<br>दर २५ | २ |
| ३० | जामेवार जरी | ·।· |
| ७५ | किमखाप | १ |
| २०५ | | ४॥ |

२०५

अशाच प्रकारचीं सनगें शिंदे, होळकर, पंतसचिव, व दुसरे सरदारांकडून आलीं आहेत.

( 103 ) Clothes worth Rs. 205 were received by the Peshvá from Sansthán Bhopal. ( Similar presents were also received from Scindia, Holkar, Pant Sachiv and others. )

A. D. 1778-79.



१०४-( ११४ ) रामचंद्र गणेश भावे यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपल्यास सरकारांतून वाड्याचे नजीक घर बांधण्यास जागा दिल्ही होती, तेथें इमल्यास नऊशें रुपये लाऊन घर बांधिलें, त्यास साल गुदस्त सरकारचे वाड्याभोंवतीं जागा मोकळी केली, याजमुळें आपलें घर मोडून इमला सरकारांत खासगीकडे घेतला, यास्तव इमल्यास सदरहू नऊशें रुपये लागले आहेत, ते अथवा जागा इमल्यासुद्धां सरकारांतून देविली पाहिजे म्हणून; त्याजवरून लक्ष्मण कास्त याची जागा पेठ बुधवार, शहर पुणें येथें बेवारसी होती, त्या जाग्यावर केशवराव बल्लाळ केतकर यांणें पेशजीं इमला बांधिला आहे, ते जागा इमलासुद्धां मल्हारजी गौंड्या, व गंगाराम सुतार चाकर सरकार यांचे गुजारतीनें किंमत रुपये साडे चारशें ४५० रुपये, ठरऊन जाग्याची हद्द महदूद. गज.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल १८

८। लांबी.
७॥ रुंदी.

१५॥।

एकूण पावणे सोळा गज, पैकीं लांबी सवा आठ गज, व रुंदी साडे सात गज, याप्रमाणें आहे, ते मशारनिल्हेस इमल्यासुद्धां देविली असे, तरी देणें; आणि सदरहूविशीं साऱ्याचे पट्टीचा तगादा मशारनिल्हेस न लावणें म्हणोन, पांडुरंगराव बाबूराव यांचे नांवें छ. १९ रबिलावल.

सनद १

रसानगी यादी.

१०५-( १२१ ) जमा जामदारखाना.

समानीन मया व अलफ जमादिलाखर ४

कमाविसमेट राजश्री राव यांसी, बरहुकूम जाबीतजंग घौशे याजकडून सनगें आलीं, ते गुजारत शेटी जरडा खिजमतगार सनगें एकूण.

रुपये.

१२५ शाला थिके २
२० चिरा बादली १

---

(104) Rámchandra Ganesh Bháve had built a house near the Government palace at a cost of Rs. 900. The building was pulled down in the preceding year to leave an open space round the palace. Rámchandra was given another house in exchange.

A. D. 1778-79.

(105) Clothes worth Rs. 375 were sent as a present to the Peshvá by Jábitjang Dhoushe.

A. D. 1779-80.

२० पटका बादली १
१०० किमखाप

---

३७५

१०६-( ७२० ) कमाविसभेट राजश्री रावसाहेब यांसी, राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांचे घरीं भोजनास गेले ते समईं दिल्ही, ती जमा गुजारत जानोजी जाबक खिजमतगार सनगें छिटी बऱ्हाणपुरी, वर काम सोनेरी, एकूण. रुपये.

इसन्ने समानीन मया व अलफ सवाल

| | | |
|---|---|---|
| १०० | तिवट छिटी बराणपुरी | १ |
| १२५ | झगा छिटी बराणपुरी | १ |
| १०० | दुपटा छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| १२५ | तुंबा किनखापी अस्तर गुलबादन | १ |
| ४५० | | ४ |
| ३० | धोतर जोडा | १ |
| ४८० | | ५ |

१०७-( ८०३ ) लग्नाचे समारंभाकरतां शहर मजकूरचे रस्ते नीट करण्यास गंवड्या वगैरे माणसें जदीद काम होई तोपर्यंत ठेवणें, म्हणोन तुम्हांस आज्ञा जाहली होती, त्यावरून तुम्हीं छ. ११ मोहरमापासून जदीद माणसें ठेविलीं, त्यांस तैनात दरमहा. रुपये.

सलास समानीन मया व अलफ रजब ३

| | | |
|---|---|---|
| ७॥ | गंवड्या असामी | १ एकूण. |
| ३० | सुबेकरी असामी | ४ दर ७॥ प्रमाणें रुपये. |
| ८४ | मजूरदार असामी | २१ दर ४ प्रमाणें. |
| १२१॥ | | २६ |

---

( 106 ) The Peshvá went to dine at Báláji Janárdan Fadnis' house.
A. D. 1781-82.

( 107 ) One mason and 25 laborers were entertained from 11th Mohorum on a monthly salary of Rs. 121-8 for repairing the roads in the city in connection with the marriage of the Peshvá.
A. D. 1782-83.



मजुरा पडेल म्हणोन, घासीराम सावळदास कसबेदार कोतवाली, शहर पुणें याचे नांवें सनद १.
रसानगी यादी १.

१०८-( ८६९ ) पागा व शिलेदार. रुपये.

खमस समानीन मया व अलफ सफर २१

२०० महादजी शिंदे याजकडून काशीद, पातशाच्या भेटी होऊन, राजश्री राव यांचे नांवें बक्षीगिरी करून घेतल्याचीं पत्रें घेऊन आले सबब इनाम. परवानगी रूबरू.
रुपये.

५० हिरा वलद टिकाराम.
५० भोपा वलद गोवर्धन.
५० पेमा वलद गंगाराम.
५० लाला वलद खेमा.

२००
० लंग.

२००

१०९-( ९१२ ) जमा जामदारखाना.

सीत समानीन मया व अलफ सफर १०

कमाविसभेट राजश्री राव यांसी, बाबत अली बहादर यास पुत्र जहाला, सबब खासा स्वारी घरास गेली, ते समई पोशाख दिल्हा, तो गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

१२० सनगें छिटी बराणपुरी.

| | | |
|---|---|---|
| ३० | तिवट | १ |
| ६० | दुपटा | १ |
| ३० | झगा | १ |
| १२० | | ३ |

---

( 108 ) Reward was given to the messengers who brought letters from Mahádji Scindia announcing that he had obtained for the Peshwá the office of Baxîgir.
A. D. 1784-85.

( 109 ) Presents were received by the Peshwá on the occasion of his visit to Ali Bahádur's house to congratulate the latter on the birth of a son.
A. D. 1785-86.

२६०-( ९२२ ) महादजी शिंदे बिन राणोजी शिंदे पाटील मौजे जामगांव, परगणे पारनेर यांणीं हुजूर किल्ले पुरंदर येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, मौजे मजकूरची पाटिलकी आपली आहे, वतनसंबंधें सरकारसेवा एकनिष्ठपणें करीत आहों, त्यास पाटिलकी समंधें इनाम जमीन नाहीं, यास्तव साहेबीं कृपाळु होऊन कांहीं जमीन नूतन इनाम करार करून देऊन चालविली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून मनास आणितां मौजे मजकूरची पाटिलकी यांची आहे, त्यास पाटिलकी समंधें इनाम जमीन यांस नाहीं; हे वतन समंधें सरकार सेवा एकनिष्ठपणें करीत आहेत, यास्तव यांचें चालवणें अवश्यक जाणोन यांजवरी कृपाळु होऊन मौजे मजकुरी येथें त्यांस पाटिलकीचें वतन समंधें अवल दुम सीम तीही प्रतीची जमीन चावर १ एक दरोबस्त कुलबाब कुलकानु हाली पटी व पेस्तर पटी जल, तरु, तृण, काष्ठ, पाषाण, निधि, निक्षेप सहित खेरीज हक्कदार करून नूतन इनाम करार करून दिल्ही असे, तरी मौजे मजकूर येथें सदरहू-प्रमाणें एक चावर जमीन चतुःसीमापूर्वक यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. दर-साल ताजे सनदेचा आक्षेप न करणें. या सनदेची प्रती लिहून घेऊन हे असल सनद यांज-वळ भोगवटियास परतोन देणें ह्मणोन.

समान सबैन मया व अलफ मोहरम १३

सनदा, पत्रें.

२ फडणिसी. सनदा.

१ नांवाची.

१ मोकदम मौजे मजकूर यास.

―――

२

२ चिटणिसी. पत्रें.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान व भावी परगणे पारनेर यांस.

१ देशमुख व देशपांडे परगणे मजकूर यांस.

―――

२

―――

४

रसानगी यादी.

---

( 260 ) One cháhur of Pátilki Inám land was given to Mahádji Scindia bin Ránoji Scindia Patel of Jámbgaum in Pergana Parner at his request.

A. D. 1777-78.

२६१–( ५३३ ) महादजी शिंदे यांजकडे फौजेचे बेगमीस परगणे भेलसे येथी दरोबस्त अंमल सरंजाम सालमजकुरापासून करार करून दिल्हा त्य विशीं. सनदा.

समान सबैन मया व अलफ सफर २६

१ धोंडो गोपाळ यांचे नांवें सनद कीं, तुह्मांकडे मामलत होती ते दूर करून परग मजकूर यांजकडे दिल्ही असे, तरी तुम्हीं महालीं बीज व तगाई दिल्ही असेल व्याज सुद्धां, व शिबंदी हिसे रसीद पैवस्ता पावेतों होईल ते घेऊन परगणे मज दरोबस्त ठाणें सुद्धां त्यांचे हवालीं करून कबज घेणें; व साल मजकूरचा वस तुह्मांकडे आला असेल तो मशारनिल्हेकडे देणें. परगणे मजकुरीं बाकी सरकार असेल ते दार किती व नादार किती ते तुम्हीं मशारनिल्हेकडे रुजू करून देणें. व बाकी मशारनिल्हे वसूल करून सरकारांत देतील ह्मणोन. सनद.

१ देशमुख व देशपांडे परगणे मजकूर यांचे नांवें सनद कीं, तुम्हीं मशारनिल्हेसी होऊन अंमल सुरळीत देत जाणें ह्मणोन. सनद.

१ महादजी शिंदे यांचे नांवें सनद कीं, रामचंद्र गणेश, व विसाजी कृष्ण यांचे स्वा पैकीं तोफखाना भेलशांत आहे, तो सरकारचा सरकारांत प्रयोजन पडल्यास आ विला जाईल. तेथें आहे तोंपर्यंत तुह्मीं माफजतीनें ठेऊन देखरेख करीत जाणें ह्मणो

३ येणेंप्रमाणें तीन सनदा दिल्या असे.

रसानगी यादी. छ. ९ जिल्काद.

२६२–( ५३७ ) परगणे खामखेड, प्रांत माळवा येथील मामलत तुह्मांकडून दूर रून महादजी शिंदे यांजकडे फौजेचे सरंजामास करार करून दि असे, तरी हे अंमल करितील, तुह्मीं दखलगिरी न करणें. परगणे म कुरीं बिन तगाई दिल्हे असेल ते व्याजसुद्धां, व तुमची शिबंदी शेबीस रसीद होईल ते तुम्हीं यांजपासून घेणें; व सालमजकूरचा वसूल तुम्हीं घेतला अ

समान सबैन मया व अलफ सफर २६

( 261 ) The Amal of Parganá Bhelse was assigned as military S anjám to Mahádji Scindia. The existing Kamávis was directed to hand it over to him, after receiving fr him the amount advanced by the Kamávisdár for se &c. to ryots, and the expenses of establishment incurred by Kamávisdár.

A. D. 1777-78.

( 262 ) The Parganá of Khámkhed in Práut Málva was assign in Military Saranjám to Mahádji Scindia.

A. D. 1777-78.

तो मशारनिल्हेकडे देणें. महालीं बाकी असेल ते रुजू करून देणें; त्यापैकीं दार बाकी असेल ते रुजू करून सरकारांत देतील म्हणोन, धोंडो गोपाळ यांचे नांवें छ. १५ जिल्काद. सनद १.

जमीदाराचे नांवें कीं, यांसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें म्हणोन. सनद १.

२

रसानगी यादी.

## मुतालिक ह्यांचे रोजनिशी पैकीं.

२६३–( १५ ) मानाजी शिंदे यांची स्त्री, व सासरे, व सासु एकूण तीन असामी तुम्हांकडे कैदेंत आहेत, त्यांस हल्लीं त्यांची मोकळीक करून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे, तरी सदरहू तीन असामी महादजी शिंदे यांचे स्वाधीन करून पावती घेणें म्हणोन, गंगाधर राव भिकाजी रास्ते यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल ६

२६४–( ५६५ ) महादजी शिंदे यांस मुलें माणसें ठेवावयास जागा देशीं नाहीं, याजकरितां किल्ले अशेर सालगुदस्तां मशारनिल्हेचे निसबतीस द्यावयाचा करार करून सनद तुम्हांस सादर केली आहे, तरी किल्ले मजकूर जंगी सामान सुद्धां मशारनिल्हेचे हवालीं करून पावलियाचे कबज घेणें म्हणोन, केशवराव जगन्नाथ यांस. सनदा २.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलावल १७

येविशीं हवालदार व कारकून किल्ले मजकूर यांस कीं, किल्ला यांचे हवालीं करून कबज घेणें, आणि तुम्हीं हुजूर येणें म्हणोन. सनदा २.

९

रसानगी यादी.

परगणे अशेर सरकार मजकूर प्रांत खानदेश जाहागीर बाबती सरदेशमुखी खेरीज मु-

---

### FROM MUTÁLIK'S DIARY.

( 263 ) Mánáji Scindia's wife, and his mother-in-law, and fathe[r-in-]law, who were in confinement with Gangádhar I Ráste were ordered to be released and made Mahádji Scindia.

A. D. 1777-78.

( 264 ) The fort of Ásher was given to Mahádji Scindia his family, and the Pargaṇa of Ásher wa him in Military Saranjám.

A. D. 1778-79.

१ केशव जगन्नाथ यांस कीं, तुम्हीं दखलगिरी न करणें म्हणोन.

१ जमीदार व परगणे मजकूर यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें म्हणोन.

२

दोन सनदा, रसानगी यादी.

सदरहू अमलाविशीं सालगुदस्तां सनदा दिल्या आहेत, परंतु सालगुदस्तां मशारनिल्हेकडे अंमल चालला नाहीं, सबब सालमजकुरीं सनदा दिल्या असेत.

२६५–( ५६९ ) नारो बल्लाळ यांचे नांवें सनद कीं, नर्मदा तीरीं भीलांचा उपद्रव भारी, त्याचा बंदोबस्त जाहला पाहिजे, याजकरितां हांडे तालुक्यांत नर्मदेमध्यें सरकारचा जुगा किल्ला आहे तो आमचे निसबतीस द्यावा म्हणोन महादजी शिंदे यांणीं विनंती केली; त्याजवरून हल्लीं मशारनिल्हेचे बदल खातर व भिल्लांच्या बंदोबस्ताबद्दल किल्ले मशारनिल्हेच्या निसबतीस दिल्हा असे, तरी किल्ले मजकूर जंगी सामान सुद्धां मशारनिल्हेच्या हवाला करून पावलियाचें कबज घेणें म्हणोन. सनद १.

तिसा सबैन मया व अलफ जमादिलाकर ८

येविशीं सदरहू अन्वयें मशारनिल्हेचें नांवें दोन. सनदा २.

१ दुसरी सनद कीं, पेशजी सनद सादर केली आहे, त्याप्रमाणें किल्ले मजकूर मशारनिल्हेचे स्वाधीन करणें म्हणोन.

१ तिसरी सनद कीं, पेशजी सनदा सादर केल्या आहेत, त्याप्रमाणें किल्ले मजकूर मशारनिल्हेचे हवाला करणें म्हणोन.

२ ३

रसानगी यादी.

२६६–( ५७१ ) राजश्री तुकोजी होळकर यांचे नांवें सनद कीं, तुमचे दौलतीची फ-

(265) Mahádji Scindia requested that the fort Juga situated in the bed of the Narbadâ in Taluka Hânde might be given to him to enable him to put down the Bhils who were infesting the territory along the Narbadâ. His request was granted and Náro Ballál was directed to hand over the fort to him.

A. D. 1778-79.

(266) Tukoji Holkar was informed that the office of his Fadnis,

तिसा सबैन मया व अलफ जमादिलाकर १७

डणिसी नारो गणेश यांस सांगितली होती, ते सालमजकुरीं त्यांजकडून दूर करून, माधवराव गंगाधर यांस सांगितली असे, तरी फडणिसीचें प्रयोजन यांचे हातें घेऊन पूर्ववत् प्रमाणें वेतन पाठवीत जाणें म्हणून.

सनद १.

परवानगी रूबरू.

२६७-( ६६६ ) संस्थानें दतीया ताल्लुके झांशी पैकीं महाल.

समानीन मया व अलफ मोहरम १

१ परगणे भांडेर पैकीं वेदमूर्ति राजश्री रघुनाथ देव चिंचवडकर यांजकडे मौजे मंडोरा, तर्फ पाल्हेर हा गांव इनाम आहे तो, व तुकोजी होळकर यांजकडे सरंजामास गांव आहेत ते खेरीज करून बाकी.

१ ताल्लुक महुमोहनी.

१ ताल्लुक खलासीस फत्तेपूर.

३

एकूण तीन महाल तुह्मांकडून दूर करून महादजी शिंदे यांजकडे फौजेचे सरंजामास सालमजकुरापासून करार करून देऊन हे सनद सादर केली असे, तरी महाल व ठाणीं जकीरासुद्धां मशारनिल्हेकडील कमाविसदाराचे हवालीं करून कबज घेणें. सालगुदस्त सन तिसा सबैन अखेर पर्यंत महालीं बाकी राहिली असेल त्याची जमीदाराचे गुजारतीनें रुजुवात करून देणें, तो ऐवज यांजकडील कमाविसदार वसूल करून देवितील. सालमजकूर पैकीं वसूल तुह्मांकडे पडला असेल त्यापैकीं शिबंदी वगैरे नेमणुकेची हिसेरसीद मुदतमाफक वजा करून, बाकी ऐवज राहिला तो यांजकडे देणें. कमी वसूल पडिला असल्यास यांजपासून घेणें म्हणोन, रघुनाथ हरी यांस. १

जमीदारांस सनदा कीं, मशारनिल्हे यांजकडील कमाविसदारासी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें म्हणोन. ३

१ परगणे भांडेर.

१ ताल्लुके महुमोहनी.

१ ताल्लुके खलासीस फत्तेपूर.

३ ४

A. D. 1778-97. which was held by Naro Ganesh, was in the current year conferred on Mâdhavrao Gangádhar and that service should therefore be accepted from the latter.

(267) The Parganas of Bhánder, Mahumohani, and Khalásis Fatepur in Taluka Zánsi of Sansthán Datiá were given to Mahádji Scindia as Military Saranjám.

A. D. 1779-80.

चार सनदा, रसानगी यादी, यासी आकार सन तिसा खमसेन कारकीर्द महादाजी गोविंद.
रुपये.

३४७३४९। परगणे भांडेर.

३७६४४९॥· ऐन जमा.

| | | | |
|---|---|---|---|
| ८६७३१ | तर्फ गीर्द भांडेर. | ३२१०९॥ | तर्फ घावल. |
| ८६२४५ | तर्फ उतुणा. | १६००१ | मौजे गोदन. |
| ३६६३५ | तर्फ बिल्हेरी. | ७५०० | मौजे पिंपरवा. |
| ५२५० | तर्फ लहराजाट. | १०००० | सायेर. |
| ९५९७८ | तर्फ पाल्हेर. | | |
| | | ३७६४४९॥ | |

९१६४॥ कमाविस देखील अंतस्त वगैरे सुभाकडील एकंदर हिशेबीं जमा आहे, त्यापैकीं हिसेरसीद अजमासें.

३८५६१४।

पैकीं वजा सरंजाम वगैरे.

३०६४८ तुकोजी होळकर यांजकडे सन समान सबैनापासून पांच लक्षांचा करार जाहला, त्यापैकीं तालुके मजकूर येथील कमाल आकाराचे गांव अलमपुरा नजीक परगणे दभुवण, परगणेभांडेर पैकीं द्यावयाचे करार केले असेत, तरी सदरहू तीस हजार सहाशें अठ्ठेचाळीस रुपये कमाल आकाराचे गांव नेमून देणें म्हणोन सब सबैनांत सनद आहे, त्याप्रमाणें बेरीज लिहिली आहे. गांव नेमून दिल्याची रुजुवात होणें असे. रुपये.

३००७०॥ ऐन.

५७७॥ कसबे व अंतस्तपैकीं हिसेरसीद अजमासें.

३०६४८

७६१७ रघुनाथ देव चिंचवडकर यांजकडे मौजे मडोरा, तर्फ पाल्हेर हा गांव इनाम आहे, त्याचा आकार.

७५०० ऐन.

११७ अंतस्त पैकीं हिसे रसीद अजमासें.

---

७६१७

---

३८२६९ बाकी.

११६२६३। तालुके महुमोहनी, व खलासीस फत्तेपूर.

११३५०० ऐन.

२७६३। कमाविस देखील अंतस्त वगैरे सुमा कडे एकंदर हिशेबीं जमा आहे, त्यापैकीं हिसेरसीद अजमासें.

---

११६२६३।

---

४६३६१२॥

चार लक्ष त्रेसष्ट हजार सहाशें साडे बारा रुपये, शिंदे यांजकडे सरंजामांत बेरीज लाऊन दिल्ही असे.

२६८–( ७११ ) सगुणाबाई शिंदे यांजकडे इनाम गांव व दोन गांवचे पाटिलकीचें वतन होतें, त्यास सालगुदस्तां मृत्य पावली, सबब गांवगन्नाचा व वतनाचा बंदोबस्त सरकारांतून कृष्णराव गोपाळ यांजकडे सांगितला होता, तो दूर करून सगुणाबाईकडे इनाम गांव व पाटिलकीचें वतन चालत होतें, त्याप्रमाणें सालमजकुरापासून महादजी शिंदे यांजकडे करार करून दिल्हे असेत, तरी मशारनिल्हेकडील कमाविसदारासी रुजू होऊन गांवचा अंमल व दोन गांवचे पाटिलकीचे वतनसमंधें हक्क लवाजिमा वगैरे सुदामतप्रमाणें सुरळीत देणें म्हणोन, मोकदम यांस वगैरे सनदा.

इसने समानीन मया व अलफ साबान १७

सनदा.

१२ मोकदम यांस.

२ परगणे कर्डे पैकीं.

१ मौजे हिवरे दरोबस्त व पाटिलकीचें वतन येविशीं. सनद.

१ मौजे वेलवडी येथील जाहागिरीचा अंमल येविशीं.

---

२

---

( 268 ) Sagunábái Scindia having died, her villages were to be made ouer to Mahádji Scindia.

A. D. 1781-82.

१ मौजे सिंदवडी, तर्फ बेल्हें, प्रांत जुन्नर येथील दरोबस्त अंमल येविशीं

२ तर्फ चांभारगोंदें, प्रांत कडेवलीत पैकीं.

१ मोजे जदाबेर येथील खेरीज मुकासा व जागीर करून दरोबस्त अंमल येविशीं. सनद.

१ मौजे भिंगलण येथील स्वराज्याचा अंमल येविशीं.

२

२ तर्फ देडगांव पैकीं.

१ मौजे टाकळी येथील स्वराज्याचा अंमल येविशीं.

१ मौजे बेलवडी येथील स्वराज्याचा अंमल येविशीं.

२

१ मौजे सोनवडी, तर्फ पांडे देडगांव येथील दरोबस्त अंमल येविशीं

१ मौजे वेहगांव पैकीं पैठण येथील जाहागिरीचा अंमल येविशीं. सनद

३ परगणे नेवासें पैकीं.

१ मौजे देडगांव येथील स्वराज्याचा अंमल व पाटिलकी येविशीं. सनद.

१ मौजे मोम येथील नांदगिरीचा अंमल येविशीं.

१ मौजे करजी येथील दरोबस्त अंमल येविशीं. सनद.

३

१२

१ कृष्णराव गोपाळ यांस सनद कीं, सदरहू बारा गांव देखील दोन गांवचे पाटिलकीचें वतन व कसबे चांभारगोंदें तर्फ मजकूर येथील सगुणाबाईचा घर वाडा वस्तभाव सुद्धां व बाग यांचा बंदोबस्त तुह्मांकडे सांगितला होता, तो दूर करून सगुणाबाईकडे इनाम गांव वगैरे चालत होते, त्याप्रमाणें सालमजकुरापासून मशारनिल्हे यांजकडे करार करून दिल्हे असे, तरी देहेहाय मजकूरचा अंमल व दोन गांवचें पाटिलकीचें वतन व कसबे मजकूरचा वाडा वस्तभाव सुद्धां, व बाग मशारनिल्हेकडील कारकून येईल त्याचे स्वाधीन करून कबज घेणें म्हणोन. सनद.

१३

रसानगी याद.

२६९-( ७३३ ) तुकोजी होळकर यांचे पुत्राचें लग्न आहे, त्यास साहित्य देविलें असे, तरी महालानिहायपैकीं आपलेकडील कारकून देऊन मशारनिल्हेकडे वाफगांवास पावते करणें; याखेरीज बेगारी लग्न होई तोंपावेतों देणें म्हणोन.

इसने समानीन मया व अलफ मोहरम ७

सनदा.

रसानगी यादी.

सुमार.

१ प्रांत पुणें निसबत रामचंद्र नारायण यांजकडून.

१४७५ बुरुडकाम.
- १००० शिपतरें.
- १०० हारे.
- १०० दुरड्या.
- ५० सुपें.
- २०० पाट्या.
- २५ चाळण्या.

१४७५

५७५० कुंभारकाम.
- १०० रांजण.
- २०० माठ.
- ३०० घागरी.
- १५० कोळंबीं.
- २०० झांकणें.
- ५०० मडकीं.
- १०० परळ.
- १०० रांधणी.
- १०० मोरवे.
- ४००० दिवेलावणी.

५७५०

२६९० सुतारकाम.
- ७५ पोळपाट.
- ५० लाटणीं.
- २५०० मेखा.
- ५० ठाणवया.
- १५ मेकसु.

२६९०

१०००० पत्रावळी.

२००० केळीचीं पानें.

३२००० वैरणपुले.
- ७००० कडबा.
- २५००० गवत.

३२०००

५० लांकडें जळाऊ गाडे.

५३९६५

त्रेपन हजार नवशें पासष्ट सुमारी, व याखेरीज बेगारी असामी १०० शंभर देविले त्याजविशीं. सनद.

---

(269) The marriage of Tukoji Holkar's son was to be celebrated at Wáfgaon. Orders were, therefore, issued to supply him with provisions and labourers.

A. D. 1781-82.

५०० शिपतरं.
१५ चाळण्या.

५१५

१९८० सुतारकाम.
२५ लाटणीं.
१९०० मेखा.
५० ठाणवया.
५ मेखसु.

१९८०

१०० माठ.
२५० घागरी.
१०० कोळंबीं.
५० झांकणें.
४०० मडकीं.
१०० परळ.
१०० रांधणीं.
१०० मोरवे.
२००० दिवेलावणीं.

३२४५

२०००० पत्रावळी.
३००० केळीचीं पानें.
३२००० वैरण पुले.
७००० कडबा.
२५००० गवत.

३२०००
५० लांकडें जळाऊ गाडे.

६०३९०

साठ हजार तीनशें नवद सुमारी, व याखेरीज बेगारी असामी १०० शंभर दे
त्याजविशीं. सनद.

१ तालुके शिवनेर निसबत बाळाजी महादेव यांजकडून. सुमारीं.

१०७५ बुरुडकाम.
६०० शिपतरें.
१०० हारे.
१०० दुरड्या.
५० सुपें.
२०० पाट्या.

२१४० सुतारकाम.
५० पोळपाट.
५० लाटणीं.
२००० मेखा.
२५ ठाणवया.

२५ चाळण्या.

१०७५

२२७९ कुंभारकाम.
९० रांजण.
७९ माठ.
१००० (?) घागरी.
९० कोळंबीं.
९० झांकणें.
३०० (?)मडकीं.
९० परळ.
९० रांधणीं.
९० मोरवे.
१५०० (?)दिवेलावणीं.

२२७९

१९ मेखसु.

२१४०

१०००० पत्रावळी.
१०००० केळीचीं पानें.
१९००० वैरण पुले.
४००० कडबा.
१५००० गवत.

१९०००
४० लांकडें जळाऊ गाडे.

४४५३०

चवेचाळीस हजार पांचशें तीस सुमारीं, व याखेरीज बेगारी असामी १०० शंभर देण्याविशीं. सनद.

१ प्रांत जुन्नर निसबत रामराव त्रिंबक यांजकडून सुमारी. सुमार.

१४७९ बुरुडकाम.
१००० शिपतरें.
१०० हारे.
१०० दुरड्या.
५० सुपें.
२०० पाट्या.
२९ चाळण्या.

१४७९

३९९० कुंभारकाम.
९० रांजण..
१०० माठ.
२०० घागरी.

२६४० सुतारकाम.
९० पोळपाट.
२५०० मेखा.
२९ ठाणवया.
१९ मेकसु.

२६४०

६००० पत्रावळी.
१०००० केळीचीं पानें.
३२००० वैरण पुले.
२५००० गवत.

५०० मडकीं.
१०० परळ.
१०० रांधणीं.
१०० मोरवे.
२५०० दिवेलावणीं.

३९९०

५० लांकडें जळाऊ गाडे.

५६१५५

छप्पन हजार एकशें पंचावन सुमारी, व याखेरीज बेगारी असामी १०० शंभर देविले त्याजविशीं. सनद.

१ परगणे कडे रांजणगांव निजबत बाबूराव माणकेश्वर यांजकडून देविलीं. सुमारीं.

४२५ बुरुडकाम.
४०० शिपतरें.
२५ सुपें.

४२५

११०० सुतारकाम.
२५ पोळपाट.
५० लाटणीं.
१००० मेखा.
२५ ठाणवया.

११००

६७५ कुंभारकाम.
२५ माठ.
१०० घागरी.
५० कोळंबीं.
२०० मडकीं.
१०० परळ.
१०० रांधणीं.
१०० मोरवे.

६७५

३००० पत्रावळी.

५२००

पांच हजार दोनशें सुमारी, व याखेरीज बेगारी असामी ५० पंनास देविले त्याजविशीं. सनद.

१ तालुक चास निसबत निळकंठराव रामचंद्र यांजकडून सुमारी.

६३५ बुरुडकाम.
६०० शिपतरें.
२५ सुपें.

३६५ कुंभारकाम.
१५ रांजण.
५० घागरी.

१०० पाट्या.
१० चाळण्या.
———
६३५
५५० सुतारकाम.
२५ लाटणीं.
५०० मेखा.
२५ ठाणवया.
———
५५०

५० कोळंबीं.
१०० मडकीं.
५० परळ.
५० रांधणीं.
५० मोरवे.
———
३६५
१००० पत्रावळी.
१०००० गवत पुळे.
१० लाकडें जळाऊ गाडे.
———
१२५६०

बारा हजार पांचशें साठ सुमारी, व याखेरीज बेगारी असामी ५० पन्नास देविले त्याजविशीं.
सनद.
——
६ सहा सनदा दिल्या असेत.

२७०–( ७४२ ) कमाविस भेट राजश्री रावसाहेब यांसी बरहुकूम तुकोजी होळकर यांचे घरीं वाफगांवास पुत्राचे लग्नास स्वारी गेली, ते समई पोषाक दिले, ते गुजारत जानोजी जाबला खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

इसने समानीन मया व अलफ सफर.

४२५ छ. २० सफर वाड्यांत पोशाख दिला तो सनगें.

| | | | |
|---|---|---|---|
| ७५ | तिवट छिटी बऱ्हाणपुरी वर काम सोनेरी | १ | |
| १५० | दुपटे छिटी बराणपुरी वर काम सोनेरी | २ | दर ७५ |
| १०० | झगा छिटी बराणपुरी वर काम सोनेरी | १ | |
| १०० | तुंबा किमखापी | १ | |
| ४२५ | | ५ | |

१७५ छ. २१ रोज वाड्यांत पोशाक दिला तो सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २५ | तिवट कच्चा रंग केसरी | १ |
| ७० | जाफरखानी कच्चा रंग केसरी | १ |

( 270 ) Presents were given by Tukoji Holkar to the Peshwá, who had gone to Wáfgaon on the occasion of the marriage ceremony of the former's son.

A. D. 1781-82.

| | | |
|---|---|---|
| २० | झगा शेल्याचा कचा रंग | १ |
| ६० | तुंबा किमखापी अस्तर छिटी | १ |
| १७९ | | ४ |

२४० छ. २२ सफर पोशाक.

| | | | |
|---|---|---|---|
| ९० | तिवट चुनडी बेलापुरी | १ | |
| १०० | दुपटे चुनडी बेलापुरी | ( २ ) | दर ५० प्रमाणें. |
| ३० | झगा चुनडी बेलापुरी | १ | |
| ६० | तुंबा किमखापी | १ | |
| ६४० ( २४० ) | | ५ | |

२९९ छ. २३ रोज निरोप समई पोशाख दिल्हा तो सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ७९ | चिराबादली तमामी | १ |
| ५० | वोढणी जरी तमामी | १ |
| १०० | झगा बादली तमामी | १ |
| ७० | तुंबा किमखापी | १ |
| | | ४ |
| ११३९ | | १८ |

२७१-( ७५६ ) महादजी शिंदे यांस मुलें माणसें ठेवावयास देशीं जागा नाहीं, याजकरितां किल्ले अशेर, सन समान सबैनांत मशारनिल्हेस द्यावयाचा करार करून तुम्हांस सनदा सादर जाहल्या आहेत, परंतु किल्ला शिंदे यांचे हवालीं जाहला नाहीं, त्याजवरून हल्लीं हे सनद सादर केली असे, तरी किल्ला मशारनिल्हेचे हवालीं जंगी सामान सुद्धां करून पावलियाचें कबज घेऊन तुम्हीं लोक सुद्धां हुजूर येणें ह्मणोन, केशवराव जगन्नाथ यांचे नांवें. सनद १.

इसने समानीन मया व अलफ जमादिलाकर ३

दाद सावंत भोंसले हवालदार व कारकून यांचे नांवें सनदा कीं, किल्ला जंगी सामान सुद्धां मशारनिल्हेचे हवालीं करून पावलियाचें कबज घेणें, आणि तुम्हीं हुजूर निघोन येणें ह्मणोन. ३

४

परवानगी रूबरू.

( 271 ) The fort of Ásher was not yet surrendered to Mahádji Scindia, as previously directed. It was now ordered to be made over to him.

A. D. 1781-82.

२७२-( ९०९ ) रत्नशालेपैकीं.

सीत समानीन मया व अलफ मोहरम २९

देणें दिंमत तुकोजी होळकर यांस कर्नाटकचे स्वारीस पाठविलें, सबब निरोप समई सदरेस विद्यमान राजश्री रावसाहेब रूबरू पाहोन दिल्हें, जडाव वगैरे किंमत रुपये ६४४९॥= छ. २४ रोज.

खासा तुकोजी होळकर यास किंमत रुपये. २३२७।

जडाव दागिने.

१ शिरपेंच घाट मिनेगार साधणी रुपें तावदानी पांच फुलाचा, बावत नानाजी शंकर दिंमत नबाब यांणीं बाळाजी जनार्दन फडणीस यांस यादगिरीचे स्वारीस दिल्हा तो किंमत. रुपये ८००

शहत.

९७ हिरे व हिरकण्या मदनाईक सुद्धां.
३ मोत्यें लोलक.

१००

१ तुरा मोत्याचा बावत रासकर्दन छ. मजकुरीं नवा केला तो किंमत रुपये १५२७।

शहत.

९१३ मोत्यें सर १९ दर २७ प्रमाणें किंमत १५१७। रुपये.
१ दांडी रुपें मूठ सोनें रुपें वजन तोळे २।-॥ एकूण किंमत रुपये १०

एकूण.

९१४

२ २३२७।

भींवजी लांबा हाते यांस शिरपेंच घाट साधा बावत रासकर्दन छ. २८ जिल्हेज सन मजकुरीं नवा केला किंमत. रुपये २००

शहत.

२७ माणकें चुणी लोलक मदनाईक सुद्धां.
६ हिरकण्या.
१८ पांच किर्डे.

(272) Tukoji Holkar being deputed to the Karnátic campaign, he and his Sardárs were honoured with presents of jewellery.
A. D. 1785-86.

१ मोती लोलक.

---

९२

दागिना १.

कासीबा होळकर यांस शिरपेंच घाट साधा पंचीगिरीचा.

शहत.

२ पांच लोलक मदनाईक सुद्धां.
२ माणकें मदनाईक बाजूस.
१ लोलक पांच मणी.

---

३८ (?)

दागिना १.

बापूजी वागमारे यांस शिरपेंच घाट साधा बदल रासकर्दन छ. १६ रमजान सन म
कुरीं नवा केला किंमत. रुपये. १५०

शहत.

२१ माणकें चुणी नाईक सुद्धां.
३० पांच किर्डे.
१ मोती लोलक.

---

५२

दागिना १.

नारो गणेश दिवाण यांस चौकडा मोत्याचा किंमत. रुपये २०१३८=

मोत्यें खरेदी गुजारत कृष्णाजी बहिरव थथे छ. मजकुरीं नवा घेतला, वजन रती २७। एकूण किंमत २००० रुपये.

मोत्यें दाणे सुमार ४

सोनें तसलमात पैकीं पिंपळ्या गाभे दर तोळा रुपये १९ प्रमाणें कि रुपये १३८=

सोनें वजन तोळे. ।।।१।।

दादाजी गंगाधर फडनीस यांस जोडी मोत्याची किंमत. रुपये ४०६।।।=

मोत्यें बाबद कंठी भोसले, सन इसने समानीनांत मोडली पैकीं वजन रती १० एकूण रुपये ४०० मोत्यें दाणे २.

सोनें बाबत तसलमात पैकीं पिं व गाभे दर तोळा रुपये १९ प्र किंमत रुपये ६।।।= सोनें वजन तोळे

पाराशर दादाजी यांस कडें सोन्याचें १ एकूण सोनें बाबत तसलमात पैकीं दर रुपये १४।। प्रमाणें किंमत रुपये ३४६८= सोनें वजन तोळे २३।।।१।।

रामराव आपाजी पळशीकर यांस कडें सोन्याचें १ एकूण सोनें बाबत तसलमात पैकीं दर तोळा रुपये १३॥ प्रमाणें किंमत रुपये २२४॥। सोनें वजन तोळे १६॥१॥।

तेरीज.

जडाव किंमत. रुपये ३४९४॥।

दागिने.

५ शिरपेंच किंमत. रुपये. १९२७॥

१ तुरा किंमत. रुपये १५२७।

६ ३४५४॥।

मोकळ जवाहीर किंमत रुपये २४००

मोत्यें.

४ प्रत चौकडा १ एकूण किंमत. रुपये २०००

२ प्रत जोडी १ एकूण किंमत. रुपये. ४००

६ २४००

वजनी वजन किंमत रुपये ५९०॥।≡

सोनें वजन. तोळे.

१।१ प्रत कुडक्यास दर १९ प्रमाणें रुपये २०

२३॥।१॥ प्रत कडें १ दर १४॥ प्रमाणें किंमत रुपये ३४६०≡

१६॥१॥। प्रत कडें १ एकूण दर १३॥ प्रमाणें रुपये२२४॥।

४१॥।१।

२७३—( १०३० ) मल्हार होळकर यांणीं फौज जमा करून सरकारचे व सरंजामीयांचे वगैरे महालांस उपद्रव करितात, सबब त्यांजकडे लोक चाकरीस गेले आहेत, त्यांचे घराच्या जप्तचा करून चौक्या घरीं बसऊन मुलें माणसें बाहेर जाऊं न देणें, आणि वस्तवानीचा जाबता जराबजरा-सुद्धां लेहून हुजूर पाठवणें ह्मणोन.

इहिदे तिसैन मया व अलफ रजब ५

सनदा.

१ नारो कृष्ण सरसुभा प्रांत खानदेश.

१ रावजी कुळकर्णी चांदवडकर.

( 273 ) Malhárrao Holkar was disturbing the Government territory, and the territory of Saranjámdárs. Houses of persons, who had gone over to him, were ordered to be attached.

A. D. 1790-91.

१ भिकाजी उत्राणकर.

२

सनद.

१ महादाजी नारायण यांस कीं, हैबतराव खळदकर वस्ती चांभारगोंदें याविशीं.

१ रामचंद्र नारायण प्रांत पुणें यांस कीं, विसाजी राम वस्ती मौजे फुरसुंगी याविशीं

१ मल्हारराव नरसी यांस कीं, दावलभाई वस्ती मौजे नांदुर मध्यमेश्वराचें, तर्फ दे
पुर, प्रांत गंगथडी येविशीं.

१ गोपाळ राम कमाविसदार मौजे धानोरी, तर्फ पाबळ, प्रांत जुन्नर यांस कीं, रामज
डफळे वस्ती मौजे मजकूर येविशीं.

९

रसानगी, गोविंदभट नीजसुरे.

२७४-( १०९१ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत महादजी शिंदे यांण वाड्यांत आले ते समई दिल्ही ती, गुजारत जिवाजी, काटकर खिजम तगार सनगें एकूण. रुपये.

सलास तिसैन मया व अलफ सवाल ३०

| | | |
|---|---|---|
| २१९० | शाला फर्द | २६ |
| २०० | जामेवारे दस्की | २ |
| १९० | रजया दस्की | २ |
| २७५ | पटके दस्की | २ |
| ४०० | पटु दस्की | २ |
| ४० | हस्तपंजे दस्की व पायपंजे दस्की. | |
| | २० हस्तपंजे | ४ |
| | २० पायपंजे | ४ |
| | ४० | ८ |
| ३२९५ | | ३६ |

( 274 ) Presents were received from Mahádji Scindia on the occas-
A. D. 1792-93. ion of his visit to the palace.

२७५–( १०९३ ) देणें महादजी शिंदे यांस, वकील मुतलकी व अमीर व उमराईचीं पर्दें पादशहा यांणीं दिल्लीहून इनायत केलीं, त्यांची नायबी सरकारांतून मशारनिल्हेस सांगितली, सबब वस्त्रें दिल्हीं, ते समई विद्यमान राजश्री राव याणीं सदरेस रूबरू पाहून दिल्हे, जडाव दागिने किंमत रुपये ४६७९८=

सलास तिसैन मया व अलफ जिल्काद १

१ शिरपेंच घाट मिनेगारी तावदानी पाच फुलाचा बाबत नवाब निजाम अल्लीखान पैकीं आला छ. ७ साबान सन सीत समानीनांत किंमत रुपये १०००

शहत.

१४५ हिरे हिरकण्या मजूरीसुद्धां.
  १ पाच मणी लोलकास.

१४६

१ जेगा घाट मिनेगार तावदानी बाबत नवाब निझाम अल्लीपैकीं छ. ७ साबान सन सीत समानीनांत आला किंमत रुपये १२००

शहत.

२०० हिरे व हिरकण्या मजूरीसुद्धां.
  १ पाच मणी लोलकास.

२०१

१ कंठी मोत्याची बाबत रासकर्दन पैकीं छ. मजकुरीं नवी केली किंमत रुपये २४७९८=

त.

१० धुगधुगी घाट साधा किंमत ३९० रुपये.
  ९ हिरे व हिरकण्या.
  १ मोती लोलक.

१०

( 275 ) The office of Nâyabi in connection with the digni Mutálik and Amirul Umrao ( conferred on by the Emperor ) was bestowed on Mahá and presents of jewellery, clothes &c, were

A. D. 1792-93.

६८ मोत्यें माळेस बाबत रासकर्दन पैकीं किंमत रुपये. २०८५८= (८

७८

एकूण.

३

२७६-( १०५४ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत महादजी शिंदे यांचे
सलास तिसैन मया व अलफ जिल्हेज २० — न्यास खासा स्वारी मेजवानीस गेली, ते समई पोशाख दिल्हा तो जारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये

| | | |
|---|---|---|
| २५० | चिरा जरी अनारदाणा | १ |
| ६०० | चादर जरी अनारदाणा | १ |
| ८० | महमुद्या धुवट | २ |
| ३५० | किमखाप | १ |
| ५० | डगला दाना केशाचा अस्तर दस्की जामेवाराचे | १ |
| ११८० (१३३०) | | ६ |

२७७-( १०५५ ) कमाविस भेट सौभाग्यवती रमाबाई यांस बाबत महादजी
सलास तिसैन मया व अलफ जिल्हेज २२ — यांणीं वाड्यांत पाठविली ती, गुजारत कालोजी मान्या खिजम सनगें एकूण. रुपये

१४५० पातळें जरी.

९०० प्रत पैकीं हिरवें रात्याचें चौकडीदार
७५० प्रत आनार दासकाचें
२०० प्रत भस्मी बना[र]सी

१४५०

४०० लुगडें पैठणी निंबाळी
५० लुगडें नारायण पेठी
७१ चोळखण पैकीं

( 276 ) Presents were received on the occasion of the Peshwá's
A. D. 1792-93. to Mahádji Scindia's tent for dinner.

( 277 ) Presents were sent by Mahádji Scindia to the Pes
A. D. 1792-93. wife.

| | | |
|---|---|---|
| ४०० | चादर जरी हिरवी मोराची चौकडीदार | १ |
| ६३० | शाला फर्द | ६ |
| ३००१ | | १७ |

२७८–( १०५६ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत महादजी शिंदे यांचे डेऱ्यास गोकुळ अष्टमी निमित्य खासा स्वारी गेली, ते समई पोशाख दिल्हा तो, गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

सलास तिसैन मया व अलफ जिल्हेज २३

| | | |
|---|---|---|
| ४० | तिवट छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| १९० | दुपटा छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| ६० | महमुद्या धुवट चंदरीच्या सनगें २ दर ३० प्रमाणें रुपये. | |
| २०० | किमखाप | १ |
| ४५० | | ५ |

२७९–( १०६९ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत महादजी शिंदे यांचे डेऱ्यास रोजगुदस्त खासा स्वारी रंगाबद्दल गेली, ते समई पोशाख दिल्हा तो, गुजारत जानाजी जाबक खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

सलास तिसैन मया व अलफ रजब २९

| | | |
|---|---|---|
| ६० | तिवट छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| १७९ | दुपटा छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| ४० | झगा धुवट शेल्याचा | १ |
| १९० | तुंबा किमखापी | १ |
| ४२९ | | ४ |

२८०–( १०८३ ) जमा जामदारखाना.

आर्बा तिसैन मया व अलफ मोहरम २२

कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत महादजी शिंदे यांचे डेऱ्यास खासा स्वारी गोकुळ अष्टमीचे उत्साहानिमित्य गेली, ते समई पोशाख दिला तो, गुजारत मलोजी जाधव खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

---

( 278 ) Presents were received on the occasion of the Peshwá's visi to Mahádji Scindia's tent on the Gokul Astami festiva

A. D. 1792-93.

( 279 ) Presents were received from Mahádji Scindia on the occasic of the Peshwá's visit to his tent on the previous dε that is, Falgun Vadya 30 for the Shimgâ festival.

A. D. 1792-93.

( 280 ) The Peshwá visited Mahádji Scindia at his tent on the kul Astami festival.

A. D. 1793-94.

| | | |
|---|---|---|
| ३५ | तिवट पैकीं | १ |
| ३०० | शेला जाफरखानी पैकीं | १ |
| ४० | शेले साधे धुवट | २ दर २० |
| १५० | किमखाप | १ |
| ५२५ | | ५ |

२८१–( ११०४ ) दौलतराव शिंदे यांस, वकील मुतलकी व अमीर व उमरा
पर्दे पादशहा यांणीं दिल्लीहून इनायत केलीं, त्यांची नायबी सरक
तून महादजी शिंदे यांस सांगितली होती, त्यास ते मृत्यु पा
सबब मशारनिल्हेस नायबी सांगोन वस्त्रें दिल्हीं, ते समई विद्य

आर्बा तिसैन मया व अलफ सवाल १०

राजश्री राव सदरेस रूबरू पाहून दिल्हे दागिने. सुमार.

१ निमचा पान जनेत्री नीट परज मुल्हेरी कोरीं व जाळीदार वर मुलामा गंगाज तहनाल रुपें तोळे १॥। वर मुलामा सोनेरी मेण मखनाली एकूण.

१ ढाल सुरती रोगण पिवळें फिरक्या व कड्या कोंडें व फुल्या रुप्याच्या वर लामा सोनेरी दर ६ प्रमाणें सुमार २४ एकूण बरहुकूम राघोजी आंगरे दागिना सुमार.

२ येलावा जामढी व मखमली नव्या सुमार.

१ प्रत निमच्यास शहत रुपें. सुमार

| | |
|---|---|
| १ कचला तोळे | २८॥. |
| १ कडी तोळे | १८२॥।. |
| २ | ३।.। |

मुलामा सोनेरी.

१ प्रत ढालेस समेत कचला रुपें तोळें १॥।= वर मुलामा सोनेरी एक

२

१ कटार शिके दौतीस लावावयास ब्ऱ्हाणपुरी परजास कुल्प सोनेरी तहजाल तोळे १८॥ वर मुलामा सोनेरी मेण मखमली बरहुकूम स्वारी विसाजी

( 281 ) Mahádji Scindia having died, the office of Nâyabi of the
A. D. 1793-94. nity of Vakil Mutáliki and Amirul Umrao was confe
on Daulatrao Scindia.

पैकीं एकूण.

१

२८२-( ११२८ ) रत्नशाळे पैकीं.

खमस तिसैन मया व अलफ रबिलाकर १८

देणें दौलतराव शिंदे यांस फौजसुद्धां मोहिमेस रवाना केलें, सबब वस्त्रें दिल्हीं ते समई विद्यमान राजश्री राव सदरेस रूबरू पाहून दिल्हे किंमत. रुपये २०५०

जडाव दागिने.

१ तुरा मोत्याचा दांडी मिनगोर फुलाचे माथां व घोसास खालीं हिरे सात सरी बरहुकूम नवाब निजाम अलीखान पैकीं किंमत. रुपये. १४००

शहत.

| | | |
|---|---|---|
| १५८ | हिरे व हिरकण्या फुलास व घोसास किंमत. | रुपये ७२० |
| ११८ | मोत्यें सरास सर ७ एकूण चव ८० किंमत. | रुपये ५६० |
| ० | दांडीस सोनें व अनुरा. | रुपये १२० |
| २७६ | | १४०० |

१ शिरपेंच तीन फुलांचा घाट साधा बरहुकूम हैबतराव पवार पैकीं किंमत. रुपये ६५०

शहत.

| | | |
|---|---|---|
| ४८ | हिरे व हिरकण्या मदनाईक सुद्धां किंमत. | रुपये ४५० |
| ६ | माणकें किंमत. | रुपये ६८ |
| १ | मोती लोलक किंमत. | रुपये ७५ |
| ० | सोनें अनुरा. | रुपये ५७ |
| ५५ | | |

२

२८३-( ११२९ ) जमा जामदारखाना.

खमस तिसैन मया व अलफ रमजान ९

कमाविस भेट राजश्री राव यांस बरहुकूम तुकोजी होळकर यांचे डेन्यास स्वारी गेली तेथें पोशाख आला तो जमा, गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

A. D. 1794-95. ( 282 ) Daulatrao Scindia was sent with an army on a campaign, and presents of clothes and jewellery were made to him.

A. D. 1794-95. ( 283 ) The Peshwá visited Tukoji Holkar at his tent.

| | | |
|---|---|---|
| ५० | तिवट जैनाबादी कच्चा रंग कलमी हिरवा | १ |
| २५० | दुपेटा जैनाबादी काटपदर जरी पैकीं असवली किनारदार रंग हिरवा कलमी | १ |
| ५० | महमुद्या धुवट चंदेरी सनगें | २ दर २५ प्रमाणे |
| २०० | किमखाप जर भरगची सनंग | (१)एक एकूण रुपये |
| ५५० | | ५ |

२८४–( ११३९ ) दौलतराव शिंदे यांणीं विनंती केली कीं, आपले तीर्थरूप महादजी शिंदे मौजे वानवडी, तर्फ हवेली, प्रांत पुणें येथें कैलासवासी जाहले त्यांचे छत्रीचे खर्चास मौजे मजकूर पैकीं छत्रीचे लगत एक चाहूर जमीन बागास वगैरे देविली पाहिजे ह्मणोन; त्याजवरून महादजी शिंदे यांचे छत्रीचे खर्चास मौजे मजकूर पैकीं जमीन चाहूर १ एक चाहूर जमीन खरेदी इकरार करून छत्रीचे लगत देविली असे, तरी सदरहूप्रमाणें एक चावर जमीन नेमून देणें ह्मणोन रामराव कृष्ण यांचे नांवें.

सीत तिसैन मया व अलफ सफर २०

सनद १.

रसानगी याद.

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

### १३ विंचूरकर.

२८५–( ११५ ) किल्ले ग्वालेर गोपाळराव नारायण यांजकडे आहे; तो त्यांजकडून दूर करून शिवाजी विठ्ठल यांजकडे सांगितला, याविषयीं सनदा.

खमैस सबैन मया व अलफ सवाल १८

१ शिवाजी विठ्ठल यांस किल्ले मजकूरचें कामकाज ते करीत आहेत, त्याप्रमाणे

( 284 ) Mahádji Scindia died at Wanavdi. Some land near his tomb was at Dowlatrao Scindiá's request assigned for the expenses connected with a monument raised in memory of the deceased.

A. D. 1795-96.

[ 1 ] POLITICAL MATTERS.

( B ) Matters relating to

( 13 ) Vinchurkar.

A. D. 1774-75. ( 285 ) The fort of Gwalior was entrusted to Shivaji Vithal.

तुम्हीं आपले तर्फेनें त्यांचे हातें घेत जाणें, आणि किल्ले मजकूरचे बंदोबस्त अलग चौकी पहारा खबरदारीनें राखणें ह्मणोन.

१ गोपाळराव नारायण यांस कीं, किल्ले मजकूरचें कामकाज तुम्हीं करीत आहां, त्याप्रमाणें मशारनिल्हे तुमचे हातें कामकाज घेतील, तुम्हीं त्यांचे इतल्यानें करीत जाणें ह्मणोन.

२

रसानगी यादी.

२८६–(१०८६) खंडेराव विठ्ठल यांचे बंधु शिवाजी विठ्ठल मृत्यु पावले, सबब मशारनिल्हेस सरदारीचीं वस्त्रें दिल्हीं, ते समई रूबरू पाहून दिल्हे. छ. १० सफर दागिने सुमार.

आर्बा तिसैन मया व अलफ सफर २५

१ निमचा पान इंग्रजी परज तांब्याचीं वर मुलामा सोनेरी बरहुकूम केदारजी शिंदे पैकीं नवा घातला तो तहनाल रुपयांचें वजन तोळे १। व नथणी रुप्याची वजन तोळे ·।।।· मेण मखमली लाल एकूण दागिना सुमार.

१ ढाल गेंड्याची रोगण पिंवळें सुरती फिरक्या लोखंडी वर मुलामा सोनेरी सुमार ६ एकूण दागिना.

१ एक वाज मढीव मखमली लाल नवी समेत कचक लोखंडी वर मुलामा सोनेरी एकूण दागिना.

३

# १ राजकीय·
## ( ब ) इतर माहिती.
### १४ पटवर्धन.

२८७–( ७९२ ) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबत चिंतामणराव पांडुरंग पटवर्धन यांचे घरीं भोजनास गेले ते समई पोशाख दिल्हा तो, गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण किंमत. रुपये.

सलास समानीन मया व अलफ जमादिलावल २०

७९ तिवट छिटी बऱ्हाणपुरी. १

( 286 ) Shivāji Vithal having died, his Sardar-ship was conferred on his brother Khanderao Vithal.
A. D. 1793-94,

[ 1 ] POLITICAL MATTERS.
( B ) Matters relating to
( 14 ) Patwardhan.

( 287 ) Presents were received on the occasion of the Peshwā's visit to Chintāmanrao Pāndurang at Patwardhan's house for dinner.
A. D. 1782-83.

६० तुंबा किमखापी १

३६० ४

२८८–( ८०५ ) प्रांत गुजराथ येथील महालानिहायचा बंदोबस्त चिंतामण हरी सर
सुभा प्रांतमजकूर यांजकडे सांगितला असे, तरी मशारनिल्हेचे तर्फेन
कारकून पाठविले आहेत, त्यांसी रुजू होऊन अंमल सुरळीत
देणें ह्मणोन. पत्रें.

आर्बा समानीन
मया व अलफ
रजब २२

१९ महालानिहाय येथील जमीदारांस. पत्रें.

१ परगणे जंबूसर.
१ परगणे बलसाड.
१ परगणे उरपाड.
१ परगणे बालवाडा.
१ परगणे सत्रागांव.
१ परगणे सुपें.
१ परगणे भुतसर.
१ परगणे अंकलेश्वर.
१ परगणे देहनबरे.
१ परगणे डबई.
१ परगणे बहादरपुरा.
१ परगणे आमोद.
१ परगणे हसोट.
१ परगणे पारचोळ.
१ परगणे बादरी.
१ परगणे पारनेरा.
१ परगणे सरभुवन.
१ कसबे सुरत.
१ जकात तापी दक्षणतीर.

१९

५ मोकदम देहाये यांस. पत्रें.

१ मौजे पढगापैकीं तलाडी.
१ मौजे दाभेळ, परगणे तलाडी.
१ मौजे पोसरा, परगणे मरोली.
१ मौजे सीमलगांव, परगणे मरोली.
१ कसबे बारडोली.

५

१ संस्थान वासदे यांस कीं, संस्थान मजकू
अंमल सुरळीत देणें ह्मणोन. पत्र.

२५ एकूण पंचवीस पत्रें चिटणिसी दिल्हीं असेत.

(288) The office of Sar Subhá of Piánt Gujráth was conferred
A. D. 1783-84. Chintáman Hari.

२८९—(११२९) कमाविसभेट राजश्री राव यांसी बाबद हाय सनगें एकूण. रुपये.

सीत तिसैन मया व अलफ जिल्हेज ४

६९९ बाबद परशराम रामचंद्र पटवर्धन यांचे घरीं खासा स्वारी भोजनास गेली, ते समईं पोशाख दिल्हा तो सनगें. रुपये.

५९९ गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| १२९ | तिवट चुनडी | १ |
| २५० | दुपटा काशीचा | १ |
| १६० | तुंबा किमखापी अस्तर गुलबदन | १ |
| ६० | झगा धुवट | १ |
| ५९९ | | ४ |

१०० गुजारत विठोबा ताम्हनकर धोत्रजोडा धुवटपैकीं १ रुपये.

६९९ ५

७४९ गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

२०९ बाबद रामचंद्र नाईक परांजपे यांचे घरीं लग्न जाहलें, सबब खासा स्वारी भोजनास गेली, ते समईं पोशाख दिल्हा तो सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| २० | तिवट पैठणी | १ |
| १२५ | दुपटा पैठणी | १ |
| २४ | महमुद्या | २ दर १२ प्रमाणें रुपये. |
| ४० | किमखाप | ·॥· |
| २०९ | | ४॥ |

५४० बाबद आबाजी कृष्ण शेलूकर शालफर्द ४ रुपये.

७४९ ८॥

१४४४ १३॥

(289) Presents of clothes were received by the Peshwá on the occasion of his going to the house of Parashrám Rámchandra Patwardhan for dinner.

A. D. 1795-96.

# १ राजकीय.
## ( ब ) इतर माहिती.
### १५ सखारामबापू.

२९०-( ३२३ ) कमाविसभेट राजश्री सखाराम भगवंत यांची स्त्री सौभाग्यवती
सबा सबैन मया व अलफ रजब १२
जुबाई प्रसूत जाली, त्यास सरकारांतून सौभाग्यवती चिमाबाई कोल कर, व सौभाग्यवती साळुबाई, बाजी बल्लाळ परांजपे यांची बहीण जबरोबर बाळंतविडा हिवऱ्यास पाठविला होता, तेथें या बाईकांस लुगडीं व दोन चोळखण आले, त्यापैकीं चोळखण उभयतां वायकांस दिल्हे, विद्यमान म श्री गंगाबाई बाकी दोन लुगडीं सरकारांत आलीं ते जमा, गुजारत जानोजी चवाण खिज तगार लुगडीं एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ५० | प्रत | १ |
| २५ | प्रत | १ |
| ७५ | | २ |

२९१-( ५८५ ) सखाराम भगवंत किल्ले सिंहीगड येथें आहेत, त्यांचे बेगमीचीं प्रमाणें. कलमें.
तिसा सबैन मया व अलफ सफर १५

शिधा खाशास उत्तम, व आचारी वगैरे ब्राह्मणांस मध्यम प्रतीचा याप्रमाणें द देत जाणें. कलम १.

खाशाकडील किरकोळ कामकाजास वगैरे माणसें. असामी.

२ कामाठी.
१ हलालखोर.

३

---

[ 1 ] POLITICAL MATTERS.
( B ) Matters relating to
( 15 ) Sakhárám Bápu.

( 290 ) The wife of Sakhárám Bhagwant having given birth
A. D. 1776-77. child, at Hivra, a present was sent to her.

( 291 ) Sakhárám Bhagwant was confined in the fort of Sinha Orders were issued to provide him with excellent f
A. D. 1778-79. and to place the service of 2 Hamáls, and 1 sweepe his disposal.

एकूण तीन असामी ठेऊन देविली असत, तरी शिरस्तेप्रमाणें तैनात करून तुम्हीं तेथें ठेऊन देणें. कलम १.

एकूण दोन कलमें लिहिलीं असेत, तरी सदरहूप्रमाणें किल्ले मजकूर पैकीं देत जाणें. मजुरा पडेल ह्मणोन, नारो महादेव यांचे नांवें. सनद १.

परवानगी रूबरू.

२९२–( ५८७ ) मोरो विश्वनाथ यांचे नांवें सनद कीं, बाग संगम बेटांतील नजीक पुणें सखाराम भगवंत यांजकडे होती, ते हल्लीं सरकारांत जप्त करून जप्तीची कमावीस तुह्मांकडे सांगितली असे, तरी बागेचा आकार चौकशीनें करून उत्पन्न होईल त्या ऐवजापैकीं बागेचा खर्च वजा होऊन, बाकी ऐवज सरकारांत पावता करून पावलियाचा जाब घेणें ह्मणोन. सनद १.

सन तिसा सबैन मया व अलफ सफर १७

परवानगी रूबरू.

२९३–( ५८८ ) सखाराम भगवंत सिंहगड येथें आहेत, त्यांस नित्यदानाविशीं वगैरे. कलमें.

तिसा सबैन मया व अलफ सफर २२

नित्य दानास दररोज नक्त रुपये १, खुर्दा शिवराई देवास वगैरे रुके ८९, नारळ १ सुमार.

एकूण रुपया एक, व नारळ १ एक, व खुर्दा शिवराई नऊ रुके येणेंप्रमाणें दररोज देत जाणें. कलम १.

मशारनिल्हेचे घरीं श्राद्ध येईल तेव्हां ब्राह्मणांस दक्षणा दर असामीस एक रुपया व भोजनाचें साहित्य देत जाणें. कलम १.

व्यतिपाताचे दानास सोन्याचे तुकडे सुमार २८॥ एकूण सोनें वजन तोळे २। सवा दोन येथून दिल्हे आहेत, त्यास दक्षणा रुपया एक देविला असे, तरी व्यतिपात येईल तेव्हां एक रुपया देत जाणें. कलम १.

शाखभाजी व पानें विड्याचीं बागेपैकीं मेळवून देणें, बागांपैकीं न मिळे तरी खरेदी करून देत जाणें. कलम १.

---

( 292 ) The garden at the *Sangam* near Poona belonging to Sakhárám Bhagwant was attached. There are several sanads on this date attaching his Saranjám situated in the various districts.

A. D. 1778-79.

( 293 ) Orders were issued to give Sakhárám Bhagwant Re. 1 and 9 Rupees for his daily alms; twenty eight pieces c gold weighing $2\frac{1}{4}$ Tolas were sent for being given him for distribution as alms on the व्यतिपात day.

A. D. 1778-79.

एकूण चार कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें देत
ह्मणोन, नारो महादेव किल्ले सिंहगड यांस. सनद १

परवानगी रूबरू

२९४-( ६०३ ) सखाराम भगवंत किल्ले सिंहीगडीं अटकेस आहेत, त्यांस किल्ले
तिसा सबैन मया व अलफ रविलाकर २१ — तापगड येथें ठेवावयाची नेमणूक करून, किल्ले मजकुरीं न्यावयास
यराम कृष्ण, व शिवराम नारायण आठवले पाठविले आहेत,
स्वाधीन मशारनिल्हेस करून पावल्याचें कबज घेणें ह्मणोन, नारो
हादेव यांचे नांवें. सनद १

परवानगी रूबरू

२९५-( ६२४ ) सखाराम भगवंत यांस दुभत्याकरतां किल्ले प्रतापगड येथें पा
समानीन मया व अलफ जमादिलाखर १० — वयाची प्रांत पुणें येथील थटीपैकीं गाय व ह्मैस दुभती सर २
वासरें सुद्धां जयराम कृष्ण यांजकडे देविलेली असे, तरी सख
भगवंत यांजकडील जप्तीचीं गुरें पेशजी प्रांत मजकूरचे थटीकडे
ल्हीं आहेत, त्यांपैकीं एक गाय व एक ह्मैस चांगली दुमती पाहून देणें ह्मणोन, रा
नारायण यांचे नांवें. सनद १

२९६-( ६३४ ) जयराम कृष्ण यांचे नांवें कीं, तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें
समानीन मया व अलफ साबान १९ — जाहलें, सखाराम भगवंत किल्ले प्रतापगड येथें ज्या घरांत ठेविले
हेत त्या घराचे चौफेर बंदोबस्ताकरतां चार दिवाळी दगडी घ
पाहिजे, येविशींची आज्ञा व्हावी ह्मणोन लिहिलें; त्याजवरून हे
तुह्मांस सादर केली असे, तरी त्यांजला तेथें ज्या घरांत ठेविलें असेल त्या भोवतीं
चौफेर चार दिवाळीची इमारत पांचशें रुपये पर्यंत खर्च लागल्यास किल्ले मजकूर पैकीं
ऊन करणें, आणि त्याचा बंदोबस्त चांगला पक्का राखणें ह्मणोन. सनद १

परवानगी रूबरू

---

(294) Sakhárám Bhagwant was sent from fort Sinhagad to
A. D. 1778-79. Pratápgad.

(295) A milch cow and a she-buffalo were sent to fort Pratá
A. D. 1779-80. for the use of the prisoner Sakhárám Bhagwant.

(296) Sanction was accorded to the expenditure of Rs. 50
A. D. 1779-80. enclosing the room in which Sakhárám Bhagwant
confined at fort Pratápgad with stone-walls on all s

२९७–( ९३९ ) त्रिंबकराव नारायण राजे बहाद्दर यांजकडे सखाराम भगवंत यांचे अंतस्ताचा ऐवज येणें तो रुपये १००००० एक लक्ष रुपये तुह्मांस सरकारांतून ऐवज देणें त्यापैकीं देविले असत, तरी सदरहू रुपयांची वरात अलाहिदा आहे, त्याप्रमाणें ऐवज घेणें, न दिल्यास मशारनिल्हेकडील महाल जप्त करून ऐवज घेणें, सदरहू एक लक्ष रुपये वसूल होये तोंपर्यंत महालची घालमेल होणार नाहीं, ऐवज तुह्मांस पावल्यावर महाल सोडून देणें ह्मणोन, महादजी शिंदे यांचे नांवें. सनद १.

समानीन मया व अलफ रमजान १९

२९८–( ७१६ ) सखाराम भगवंत किल्ले रायगड येथें मृत्य पावले, त्यांची वस्तभाव होती ते तुम्हीं गोविंद विश्वनाथ कारकून किल्ले मजकूर यांजबरोबर हुजूर पाठविली ते बीतपशील.

इसन्ने समानीन मया व अलफ रमजान १८

किता.

२ लेप.
- १ दस्ती बुटेदार.
- १ बऱ्हाणपुरी पिंवळें.

२

१ गोदडी शालजोड्याची.
- १ लाखी जोडी.
- १ सफेत जोडी.

२

२ रुमाल दस्ती.

७ आंगवस्त्रें.

१ न्याहाली अतलसी पराची.

किता.

१ घोंगडी सफेद.

१ गवाळें घोंगडीचीं.

१३ तांबें दागिनें.
- २ पंचपात्रे लहान.
- २ तबकड्या.
- १ पळी संधेची.
- १ तांब्या.
- ७ कर्डे.

१३

४ पितळी दागिने.
- १ घाटमुट खडगपात्री.
- १ पंचपात्र.

---

( 297 ) Trimbak Náráyan Rájebahádar owed one Lac of rupees to Sakhárám Bhagwant an actt: of अंतस्थ ( bribe ): Mahádji Scindia was requested to recover the amount in payment of the amount due to him by Government.

A. D. 1779-80.

( 298 ) Sakhárám Bhagwant died at fort Ráigad. His clothes, whic[illegible] were received from the fort, were made over to h[illegible] family.

A. D. 1781-82.

२ उशा पराच्या.

१ अतलसी थोर.

२ किमखापी.

---

३

२ गिर्द्या पराच्या.

१ जाजम छिटी साधें.

१ शालजोडी पिंवळी.

१ धोतरजोडा जुना.

१ टोपी सकलादी जुनी.

१ शेला नारायणपेठी साधा.

३ आभ्रे उशाचे.

१ पलंगपोस.

१ पितांबर मर्दानी.

१४ वस्त्रें सकलादी देवाचे संपुष्टांतील.

१ गोमुखी सकलादी.

---

४३

३७ कित्ता.

---

८०

१ फासांडी.

१ तबकडी.

---

४

९ माळा.

८ रुद्राक्षाच्या मणी सुमार २

१ स्पटिकाच्या मणी सुमार १

---

९

१ संबळी वेताची झांकणसुद्धां म

व सकलादी.

१ शंख लहान टोपण सोन्याचें म

६ देव.

१ शालग्राम.

१ बाण नर्मदी.

१ गणपती नर्मदी.

१ सूर्यकांत.

१ सुवर्णमुखी.

१ चक्रांगीत सोन्याचे म

साखळीसुद्धां.

---

६

१ संपुष्ट रुप्याचा झांकणसुद्धां दे

चा वजन तोळे १६॥।

---

३७

एकूण सुमारी ऐशीं सदरहू प्रमाणें पाठविलीं, ते परभारे सखाराम भगवंत यांचे दिल्हीं असे ह्मणोन, रघुनाथ सदाशिव यांचे नांवें. जाब १.

परवानगी रूबरू.

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

### १६ बाळाजी जनार्दन.

२९९–( ५०० ) बाळाजी जनार्दन यांजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम सालमजकुरापासून महाल व गांव येथील अंमल पेशजीचे अंमलदाराकडून दूर करून करार करून दिल्हा असे येविशीं. सनदा.

समान सबैन मया व अलफ रमजान २१

८ कमाविसदारांस सनदा कीं, खेरीज दुमाले गांव व हिसेदार करून दरोबस्त अंमल दिल्हा असे, तरी अंमल देखील ठाणें मशारनिल्हेकडील कमाविसदारांचे स्वाधीन करून कबज घेणें. सालमजकूरचा वसूल घेतला असेल त्यापैकीं महाल मजकूर शिबंदी हिसेरसीद वजा करून, बाकीचा ऐवज यांजकडे माघारा देणें ह्मणोन. सनदा.

१ परगणे सरभुवन, प्रांत गुजराथ येथील खेरीज दुमाले गांव करून दरोबस्त अंमले येविशीं चिंतामण हरी यांस. सनद.

१ परगणे भोकर, प्रांत बागलाण येथील खेरीज मोकासा व दुमाले गांव करून जाहगीर, व बाबती, व सरदेशमुखीचा अंमल देखील जकात व सुभा निसबत कलमेंसुद्धां, येविशीं लक्ष्मण सादो, व वासुदेव नारायण यांस. सनद.

१ परगणे चोपडें, प्रांत खानदेश येथील खेरीज मुकासा व दुमाले गांव करून जाहगीर व बाबती व सरदेशमुखीचा अंमल देखील जकात व सुभा निसबत कलमें सुद्धां येविशीं गोपाळराव हरी यांस. सनद.

१ परगणे जलोद, प्रांत खानदेश येथील खेरीज दुमाले गांव व नांदेड तर्फेचा मुकासा करून जहागीर, व बाबती, व सरदेशमुखी, व मुकासा देखील जकात व सुभा निसबत कलमें सुद्धां येविशीं काशी नारायण यांस. सनद.

१ परगणे कोतुळ येथील खेरीज फुटगांवचा मुकासा व दुमाले गांव करून जाहगीर, व बाबती, व सरदेशमुखीचा अंमल, व हरजी घारे यांजबद्दल मुकासा जप्त आहे त्यासुद्धां देखील जकात येविशीं गोविंदराम यांस. सनद.

---

[ 1 ] POLITICAL MATTERS.

( b ) Matters relating to

( 16 ) Balájí Janárdan.

( 299 ) Some Mahāls and villages in Gujráth, Báglan, Doulatábad & Karád were assigned in military Saranjám to Balájí Janárden.

A. D. 1777-78.

१ परगणे अंतूर सरकार दौलताबाद येथील बाबती व सरदेशमुखीचे ऐवजी व
बस्त अमलाचे गांव पेशजी सरकारांत घेतले आहेत, त्यांची कमावीस तुह्मां
आहे, त्यापैकीं मशारनिलेकडे फौजेचे सरंजामास रुपये २४५०० चौवीस ह
पांचशें रुपये तनख्याचे गांव द्यावयाचा करार करून हे सनद तुह्मांस स
केली असे, तरी सदरहू बेरजेचे गांव यांजकडून कमाविसदाराकडे नेमून दे
हिशेबीं याचे नांवें खर्च लिहिणें, गांव नेमून द्याल तेथील सालमजकूरचा व
तुह्मीं घेतला असेल त्यापैकीं महाल मजकूर शिबंदी हिशेरसीद वजा क
बाकीचा ऐवज यांजकडे माघारा देणें ह्मणोन, धोंडो महादेव यांस. स

१ प्रांत कऱ्हाड पैकीं गांव.

१ मौजे सेलगांव, तर्फ हवेली.

१ मौजे विंग, तालुके हवेली येथील कमावीस लक्ष्मण कान्हेरे यांजकडे पे
सांगोन प्रांतमजकुराकडे ऐवज द्यावयाचा करार आहे तो.

---

२

एकूण दोन गांवचे हुजूर मामल्याचा अंमल तुह्मांकडून, व लक्ष्मण क
यांजकडून दूर करून मशारनिल्हेकडे फौजेचे सरंजामास दिल्हा असे,
हरदुगांवचे हुजूर मामल्याचा दरोबस्त अंमल यांजकडून कमाविसदार कर
तुह्मी सदरहू अमलाचा आकार होईल तो यांचे नांवें पथकाचे सरंजामांत
लिहीत जाणें. सालमजकूरचा वसूल हरदुगांवचा घेतला असेल तो माघारा
व याखेरीज तर्फ हवेली पैकीं हर एक गांवीं जमीन रुपये ९१८≡ येक्य
रुपये तीन आणे आकाराची मशारनिल्हेस सदरहू सरंजामांत द्यावयाचा
करून देविली असे, तरी नेमून देऊन खर्च लिहिणें ह्मणोन, श्रीनिवास शा
यांस. सनद

१ मौजे माणीकशेडे, तर्फ कडे, परगणे पाडेपडगांव येथील जहागिरीचा अंम
विशीं भगवंतराव राम यांस. सनद

---

८

९ जमीदार व मोकदम यांस सनदा कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन सदरहू
सुरळीत देणें ह्मणोन. सनद

६ जमीदारांस. सनद

२ प्रांत खानदेश.

१ परगणे चोपडें.

१ परगणे जलोद.

—

२

१ परगणे भा(भो?) कर, प्रांत बागलाण.

१ परगणे सरभुवन, प्रांत गुजराथ.

१ परगणे कोतुळ.

१ परगणे अंतूर पैकीं साडेचोविस हजार रुपये तनख्याचे गांव येविशीं.

—

६

३ मोकदम यांस. सनदा.

२ प्रांत कऱ्हाड पैकीं गांव येविशीं.

१ मौजे सेलगांव, तालुके हवेली.

१ मौजे विंग, तर्फ हवेली.

—

२

१ मौजे माणिकदोंड, तर्फ कडे, परगणे पाडेपेडगांव.

—

३

—

९

—

१७

रसानगी यादी.

३००–( ७९९ ) कमाविस भेट सौभाग्यवती रमाबाई यांसी बाबत बाळाजी जनार्दन फडणीस यांचे स्त्रीचें ओटभरण जहालें, सबब घरीं स्वारी गेली ते समई दिल्ही ती, गुजारत भिवाजी संकपाल खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

सलास समानीन मया व अलफ जमादिलाखर ३०

१२० पातळ जरी तमामी सोनेरी पदर कारचोबी १

५ चोळखण चोळी जरी बादली १

—

१२५ २

( 300 ) A present of clothes was received by Ramábái on the occasion of her visit to Baláji Janárdan Fadnis' house on acct: of the ओटभरण ceremony of the Fadnis' wife ( the ceremony performed on the first appearance of the menses. )

A. D 1782-83.

३०१-( ८६३ ) राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांस पुत्र जाहल्याचें वर्तमान घेऊन आले, त्यांस इनाम विद्यमान राजश्री राव छ. २८ सवाली सनगें एकूण. आंख.

खमस समानीन मया व अलफ जिल्काद १५

२००। खिजमतगार निजबत बाळाजी जनार्दन यांजकडील यांस. आंख.

१००। नरसोजी बिन गोपाळजी गुड यास सनगें. आंख.

| | | |
|---|---|---|
| २८ | तिवट | १ |
| ७२। | गोलदार | १ |
| १००। | | २ |

१०० आपाजी जाधव यास. आंख.

| | | |
|---|---|---|
| २९ | तिवट साधें. | १ |
| ७१ | गोलदार | १ |
| १०० | | २ |

| | |
|---|---|
| २००। | ४ |

७८। नयाजी निकम निसबत हरी बल्लाळ यांजकडील यांस सनगें. आंख.

| | | |
|---|---|---|
| ३७॥। | तिवट साधें | १ |
| ४०॥ | गोलदार | १ |
| ७८। | | २ |

| | |
|---|---|
| २७८॥ | ६ |

३०२-( ८७६ ) विद्यमान बाळाजी जनार्दन फडणीस सालगुदस्तां नवाब निजाम अलीखान बहादर यांचे भेटीस यादगिरीस गेले होते, त्यास स्वारींत सनदा व पत्रें दिल्हीं तीं इस्तकबील छ. ८ जमादिलावल सन आर्बा छ. २० साबान सालमजकूर सन खमस, तीं या तारखेस बार केलेलीं आहेत.

खमस समानीन मया व अलफ रबिलाकर १५

( 301 ) Reward was given to the attendants who brought news of the birth of a son to Báláji Janárdan Fadnis.
A. D. 1784-85.

( 302 ) Báláji Janárdan Fadnis had gone to Yádgiri in the preceeding year to visit Nawáb Nizám Alikhán Bahádur.
A. D. 1784-85.

३०३-( १०९९ ) जमा जामदारखाना.

आर्बा तिसैन मया व अलफ रजब ५

कमाविसभेट सनगें एकूण. रुपये.

४८० राजश्री राव यांसी बाबद राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांणीं बागांत मेजवानी केली, ते समई पोशाख दिल्हा तो, गुजारत मलोजी जाधव खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ८० | तिवट सोनेरी | १ |
| २०० | दुपेटा सोनेरी | १ |
| ७५ | झगा धुवट सोनेरी | १ |
| १२५ | तुंबा किमखापी अस्तर गुलबदन | १ |
| ४८० | | ४ |

१९ सौभाग्यवती येशवदाबाई यांसी बाबद गणेश कृष्ण गोखले यांणीं माहेरीहून येते समई दिल्हीं तीं, गुजारत केदारजी येवला खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| १६ | लुगडें | १ |
| ३ | चोळखण | १ |
| १९ | | २ |

४९९

३०४-( १११४ ) जमा जामदारखाना.

खमस तिसैन मया व अलफ सफर २

कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबद राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांचे घरीं खासा स्वारी श्रीपार्थिव गणपतींचे दर्शनास गेली ते समई पोशाख दिल्हा तो, गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार, सनगें एकूण. रुपये.

५०० सनगें आंबवी वर काम सोनेरी भस्मी.

| | | |
|---|---|---|
| १०० | तिवट | १ |

( 303 ) Presents were received from Báláji Janárdan Fadnis on the occasion of a garden party given by him to the Peshwá.
A. D. 1794-95.

( 304 ) Presents were received on the occasion of the Peshwá's visit to Báláji Janárdan Fadnis' house on the Ganesh Chaturthi festival.
A. D. 1794-95.

| | |
|---|---|
| २०० दुपटा | १ |
| २०० झगा | १ |
| ५०० | ३ |
| १५० तुंबा किमखापी हिरवा अस्तर गुलबदन | १ |
| ६५० | ४ |

३०५-(११२८) कमाविस भेट राजश्री राव यांसी बाबद राजश्री बाळाजी जनार्दन फडणीस यांचे बागांत खासा स्वारी भोजनास गेली ते समई पोशाख दिल्हे ते, गुजारत हाय सनगें एकूण. रुपये.

सीत तिसैन मया व अलफ जिल्हेज १

१७६५ गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | |
|---|---|
| १४० तिवट चुनडी | १ |
| ३५० दुपटा काशीचा | १ |
| १२५ झगा धुवट | १ |
| २०० तुंबा किमखापी अस्तर गुलबदन | १ |
| ८१५ | ४ |

९५० प्रत पोशाख भोजनोत्तर दिल्हा तो सनगें एकूण. रुपये.

७५० सनगें छिटी ब्ऱ्हाणपुरी सफेद वरकाम कलमी सोनेरी.

| | |
|---|---|
| १५० तिवट | १ |
| ४०० दुपटा | १ |
| २०० झगा | १ |
| ७५० | ३ |
| २०० तुंबा किमखापी अस्तर गुलबदन | १ |
| ९५० | ४ |
| १७६५ | ८ |

(305) The Peshwá went to a dinner party in the Garden of Báláji Janárden Fadnis.

A. D. 1795-96.

८० गुजारत विठोबा ताह्मनकर धोत्रजोडा धुवट पैठणी अ-
सावली किनारदार १ एकूण रुपये.

१८४५ ९

# १ राजकीय.
## ( ब ) इतर माहिती.
### १७ घोरपडे.

३०६–( २१५ ) मुरारराव हिंदुराव घोरपडे सेनापति यांस पांच हजार रुपयांचे गांव सरंजामास तालुके कोपल पैकीं सालमजकुरीं द्यावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहू पांच हजार रुपयांचे गांव कमाल जमेचे तालुके मजकूरपैकीं नेमून देणें ह्मणोन, माधवराव चिंतामण, व गंगाधर विश्वनाथ यांचे नांवें. सनद १.

सीत सबैन मया व अलफ जमादिलाकर १३

रसानगी यादी.

मुरारराव हिंदुराव घोरपडे सेनापति यांस पांच हजार रुपयांचे गांव सरंजामास तालुके धारवाडपैकीं सालमजकुरीं द्यावयाचा करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी सदरहू पांच हजार रुपयांचे गांव कमाल जमेचे तालुके मजकूरपैकीं नेमून देणें ह्मणोन, व्यंकटराव नारायण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

३०७–( ३१४ ) दौलतराव हिंदुराव घोरपडे यांचे नांवें सनद कीं, मुरारराव घोरपडे सेनापति यांजकडे तालुके बागलकोटपैकीं महाल बीतपशील.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाखर २८

१ परगणा सिद्धनाथ.

१ परगणा बलौती.

[ 1 ] POLITICAL MATTERS.

( b ) Matters relating to

( 17 ) Ghorpade.

( 306 ) The Peshwá granted to Murárrao Hindurao Ghorpade Senápati, villages worth Rs 10000 in Saranjám in Ta' ka Kopal and Taluka Dhárwar.

A. D. 1775-76.

( 307 ) Three Maháls' in Taluka Bagalkot viz. Sidhanath, Be' Nilgupe were held in Military Saranjám by Dau' Hindurao Ghorpade on behalf of Murárrao Ghc Senápati. The Maháls were now retransfer Murárrao.

A. D. 1776-77.

१ निलगुपे.

---

३

एकूण तीन महालचा अंमल फौजेचे सरंजामास आहे, त्यास त्यांणीं आपले तर्फेनें
ह्यांकडे सदरहू महालचा अंमल दिला आहे, तो हल्लीं सरकारांतून मुरारराव घोरपडे यां
कडे पेशजीप्रमाणें फौजेचे सरंजामास सदरहू महालचा अंमल करार करून दिला अ
तरी हुजूरून कारकून पाठविला आहे, याचे गुजारतीनें ठाणीं जकीरासुद्धां मशारनि
यांचे स्वाधीन करून पावलियाचें कबज घेणें ह्मणोन. सनद १.

येविशीं जमीदार यांस कीं, मशारनिल्हे यांसी रुजू होऊन परगणे मजकूरचा अं
सुरळीत देणें ह्मणोन. सनदा ३.

१ सिद(द्ध)नाथ परगणे.
१ परगणे बलौती.
१ परगणे निलगुपे.

---

३ ४

रसानगी यादी.

३०८–( ४३९ ) त्रिंबकराव येशवंत कमाविसदार, परगणे गोकाक यांचे नांवें स
कीं, मुरारराव हिंदुराव घोरपडे ममलकत मदार सेनापति यांचा ताल
हैदरखानानें दाबला, सबब यांचे बाईकोस, व मुलास परगणे मज
पैकीं राहण्यास पंधरा हजार रुपयांचे कमाल बेरजेचे गांव द्यावया
करार करून हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी परगणे मजकूरपैकीं एक ठ
लहान, व गांव सदरहू पंधरा हजार रुपयांत लाऊन देऊन यांजकडे चालवणें ह्मण

सबा सबैन
मया व अलफ
रबिलावल २३

सनद १.

रसानगी यादी.

## हरिराव पांडुरंगराव ह्यांच्या कीर्दीपैकीं.

३०९–( ७६२ ) गणेश कृष्ण कमाविसदार दिंमत परशराम रामचंद्र ठाणे आलमे
परगणे मजकूर यांस कीं, ठाणे मजकूर मालोजी घोरपडे यांजकडे
ह्मणोन सालगुदस्तां सरकारांतून सनद सादर जाहली आहे, त्याप्र
घोरपडे यांजकडील कारकून तुह्मांकडे येतील, त्यास सरकारचे व

इसन्ने समानीन
मया व अलफ
जमादिलाखर २१

---

(308) The Taluka of Murárrao Hindurao Ghorpade Mámlacat M
dár having been usurped by Haider khan, villages wo
Rs. 15000 were ordered to be given to him in parg
Gokák for his support.

A. D. 1776-77.

(309) The Kamávisdár of Thana Almele and Thana Kadkol
directed to hand over the Thanas to Máloji Ghorpade
agreed upon in the preceding year.

A. D. 1781-82.

येविशीं जमीदार परगणे मजकूर यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनद १.

२

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दफ्तर रुजू याद.

परगणे इंदूर व परगणे बोधन सरकार नांदेड येथील जहागिरीचा अंमल नवाब निजाम अलीखां बहादूर यांणीं सरकारांत लाऊन दिल्हा, त्याची कमावीस सालमजकुरीं तुह्मांकडे सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून आकार होईल त्यापैकीं महाल मजकूर शिबंदीखर्च परगणे बोधन येथील नेमणुकेच्या अन्वयें, व इंदूर येथील कार्याकारण होईल तो वजा करून, बाकी ऐवज सरकारांत पावता करून जाब घेणें ह्मणोन, श्रीनिवास शामराव यांचे नांवें. सनद १.

येविशीं जमीदार यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन परगणे मजकूरचा अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनदा २.

१ परगणे इंदूर.
१ परगणे बोधन.

२ ३

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दप्तर.

परगणे मांडवे सरकार परांडे येथील जहागिरीचा अंमल नवाब निजाम अलीखां बहादूर यांणीं सरकारांत लाऊन दिल्हा, त्याची कमावीस सालमजकुरीं तुह्मांकडे सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून आकार होईल, त्यापैकीं महाल मजकूर शिबंदीखर्च कार्याकारण होईल तो वजा करून, बाकी ऐवज सरकारांत पावता करून जाब घेणें ह्मणोन, बापूजी बाबाजी यांचे नांवें. सनद १.

जमीदार परगणे मजकूर यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनद १.

२

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दप्तर.

परगणे हैस सरकार नांदेड येथील जहागिरीचा अंमल नवाब निजाम अलीखां बहादूर यांणीं सरकारांत दिल्हा, त्याची कमावीस तुह्मांकडे सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून आकार होईल त्यापैकीं महाल मजकूर शिबंदीखर्च नेमणुकेचे अन्वयें होईल तो वजा करून, बाकी ऐवज सरकारांत पावता करून जाब घेत जाणें ह्मणोन, मोरो अनंत यांचे नांवें. सनद १.

येविशीं जमीदार परगणे मजकूर यांस कीं, मशारनिल्हेसी रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनद १.

२

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दप्तर.

परगणे पानगांव बाराबिदींचे सरकार परांडे येथील जहागिरीचा अंमल नवाब निजाम अल्लीखां बहाद्दर यांणीं सरकारांत दिल्हा, त्याची कमावीस तुह्मांकडे सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून आकार होईल, त्यापैकीं महाल मजकूर शिबंदीखर्च कार्याकारण होईल तो वजा करून, बाकी ऐवज सरकारांत पावता करून जाब घेत जाणें ह्मणोन, कृष्णाजी माणकेश्वर यांचे नांवें. सनद १.

येविशीं रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन जमीदार परगणे मजकूर यांस. सनद १.

२

रसानगी, त्रिंबकराव नारायण कारकून निसबत दप्तर.

३५४–( ११२६ ) दौलताबादचा किल्ला नवाब निजाम अल्लीखां बहाद्दर यांणीं सरकारांत दिल्हा येविशीं. सनदा.

खमस तिसैन
मया व अलफ
सवाल ६

१ मीरहसन अल्लीखान दिंमत मीर हैदरजंग यांस कीं, किल्ला सरकारांत द्यावयाचा ठराव होऊन नवाब निजाम अल्लीखां बहादूर यांणीं सनद व किल्ला सरकारांत सोडण्याविशीं पत्र मीर हैदरजंग मुनसी यांचे नांवें दिल्हें, तें मशारनिल्हेनीं घेऊन तुमचे नांवें दोन पत्रें दिल्हीं तीं पाठविलीं आहेत. सदरहू पत्रें घेऊन किल्ला धोंडो महादेव यांचे स्वाधीन करून अलाहिदा नवाबाचे नांवें सरकारची रसीद दिल्ही आहे ती घेणें ह्मणोन. सनद.

१ मीर हैदरजंग यांस कीं, नवाब निजाम अल्लीखां बहादूर यांणीं किल्ला सरकारांत देऊन सनद दिल्ही आहे, त्यास किल्ला हवालीं करून घ्यावयास धोंडो महादेव यांस पाठविले आहेत, तरी किल्ला मशारनिल्हेचे हवालीं करून कबज घेणें ह्मणोन. सनद १.

१ नवाब निजाम अल्लीखां बहाद्दर यांस कीं, किल्ला सरकारांत द्यावयाचा ठराव होऊन आसाहेबांनीं सनद व पत्र दिल्हें, त्या बमोजीब मीर हैदरजंग यांणीं

( 354 ) The fort of Doulatábád was surrendered by Nawáb Nizám Alli to the Peshwá.
A. D. 1794-95.

किल्ला सरकारांत दिल्हा, तो कराराप्रमाणें पोहोंचला ह्मणोन. सनद.

३ तीन सनदा दिल्या असेत.

रसानगी, त्रिंबकराव नारायण परचुरे कारकून निसबत दप्तर.

३५५-( ११२७ ) महालानिहाय व फुटगांव येथील नवाब निजाम अलीखां बहादूर यांजकडील जहागिरीचे अमलाचे बंदोबस्ताचें काम तुह्मांकडे सांगितलें होतें, त्यास हल्लीं सरकारचा व नवाबाचा तह ठरला, सबब हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी महालानिहाय, व फुटगांव येथील जहागिरीचे अमलाचीं ठाणीं नवाबाकडील अंमलदार यांचे स्वाधीन करून कबज घेणें. ते अंमल करतील. तुह्मांकडे सालमजकुरींचा वसूल पडला असेल त्याची वासलात तेरीखवार जमीदारांचे दस्कतानिशीं लिहून घेऊन, कारकुनाबरोबर हुजूर पाठऊन देणें ह्मणोन, कमाविसदारांस सनदा, व जमीदार, व मोकदम यांस चिटणिसी. पत्रें.

खमस तिसैन मया व अलफ जिल्काद १६

१० महालानिहाय निसबत जोत्याजी जाधवराव महाल. बीतपशील.

| | |
|---|---|
| १ परगणे वेताळवाडी. | १ परगणे फुलंबरी. |
| १ परगणे खुलताबाद. | १ परगणे कनड. |
| १ परगणे उडणगांव. | १ परगणे गोताले. |
| १ परगणे हवेली औरंगाबाद. | १ परगणे पिंपरी. |
| १ परगणे सुतोडा. | |
| | ९ |

नऊ महाल येविशीं.

१ जोत्याजी जाधवराव यांस कीं, कसबे बाबरे, परगणे फुलंबरी, व मौजे अवकळे, परगणे कनड हे दोन्ही गांव तुह्मांकडे, व संभाजी, व मलोजी जाधवराव यांजकडे नवाबाकडून आहेत, ते खेरीज करून बाकी महालाविशीं. सनद.

९ जमीदारांस चिटणिसी. पत्रें.

१०

---

( 355 ) A treaty having been concluded with Nawáb Nizám Alli his Jahágir Amals, which were attached, were ordered to be restored.

A. D. 1794-95.

१६ महाल निसबत लक्ष्मणराव नागनाथ महाल बीतपशील.

१ परगणे हरसुल.
१ परगणे सातारें.
१ परगणे रांजणी.
१ परगणे भोकर्दन.
१ परगणे रोशनगांव.
१ परगणे देउळघाट.
१ परगणे चाडोल.
१ परगणे माटरगांव.
१ परगणे धाड.
१ परगणे धावडे.
१ परगणे वाकद.
१ परगणे चिखली.
१ परगणे घाटबोरी.
१ परगणे जाफराबाद.
१ परगणे सोवली.

१९

पंधरा महाल येविशीं.

१ लक्ष्मणराव जगन्नाथ यांचे नांवें. सनद.
१९ जमीदारांस. पत्र(त्रें?).

१६

२ परगणे टाकळी हा महाल नवाबाकडून रे(वे?)णुराव धोंडाजी यांजकडे आहे येविशीं.

१ धोंडोराम, व बाळाजी महादेव यांस कीं, परगणे मजकूरचा वसूल घेतला असेल तो माघारा देणें ह्मणोन. सनद.
१ जमीदारास. पत्र.

२

२ परगणे वैजापूर येविशीं.

१ प्रभाकर गोविंद यांचे नांवें. सनद.
१ जमीदारास. पत्र.

२

८ महाल व गांव निसबत येशवंतराव महादेव. बीतपशील.

६ महाल.

१ परगणे टेंभुर्णी.
१ परगणे उदरतपा.
१ परगणे रासीन पैकीं गांव कवीजंगाकडील खेरीज करून

१ तर्फ कडे, परगणे कडेवलीत.
१ परगणे पाडे पेडगांव, सरकारांत पेशजी गांव
ते खेरीज करून.
१ परगणे कडेवलीत, सरकारचे गांव खेरीज करून.

६

१३ तर्फ चांभारगोंदें पैकीं. दे

१ मौजे कोरेगांव. १ मौजे लोणी मसदपूर.
१ मौजे केडगांव. १ मौजे जातेगांव.
१ मौजे वरलाटणें. १ मौजे चोंडी.
१ मौजे उदरगांव. १ मौजे खडकी.
१ मौजे उपडगांव. १ मौजे खातगांव.
१ मौजे दिघी. १ मौजे निखोडी.
१ मौजे पांचपिपळे.

१३

१९

एकूणीस महाल व गांव येविशीं.

१ येशवंतराव महादेव यांस सदरहू महाल, व गांव येविशीं स
७ जमीदार व मोकदम यांस चिटाणिसी. पत्रें.
६ जमीदार महालानिहाय यांस.
१ मोकदम देहाय तर्फ चांभारगोंदें यांस.

७

८

२ परगणे शिवणें येविशीं.

१ कृष्णाजी माणकेश्वर यांचे नांवें. सनद.
१ जमीदार यांस. पत्र.

२

२ परगणे खंडाळे येविशीं.

१ बापूजी लक्ष्मण यास. सनद.
१ जमीदारास. पत्र.

१३ महाल निसबत आबाजी कृष्ण. बीतपशील.

| | |
|---|---|
| १ परगणे निउर. | १ कसबे टाकळी कुंभकर्ण. |
| १ परगणे हटे. | १ परगणे वालुर. |
| १ परगणे भोगांव. | १ परगणे टाकळी नीलवर्ण. |
| १ परगणे झरी. | १ परगणे लोणार. |
| १ परगणे चारठाणें खेरीज मौजे उमरखेड. | १ परगणे पडदुर देखील तर्फ श्रीदेवी. |
| १ परगणे लोहगांव. | |
| १ परगणे कोसडी. | १२ |

बारा महाल व गांव येविशीं.

१ आबाजी कृष्ण यांस कीं परगणे पडदुर पैकीं पंचवीस हजार रुपये तनख्याचे गांव सरकारांत द्यावयाचे खेरीज करून बाकी सदरहू महाल, व गांव येविशीं.

१२ चिटणिसी. पत्रें.

१ मोकदम कसबे टाकळी कुंभकर्ण यास.

११ जमीदार महालानिहाय यांस.

१२

१३

२ महाल निसबत लक्ष्मण खंडेराव. बीतपशील.

१ परगणे मेहेकर.

१ परगणे साखरखेडलें.

२ दोन महाल येविशीं.

१ लक्ष्मण खंडेराव यांचे नांवें सदरहू महालाविशीं. सनद.

२ जमीदारांस. पत्र(त्रें).

३

२ महाल निसबत पांडुरंग बल्लाळ. बीतपशील.

१ परगणे वाळुंज.

१ परगणे खानापूर.

२ दोन महाल येविशीं.

१ पांडुरंग बल्लाळ यांस. सनद.
२ जमीदारांस. पत्रें.

---

३

९ गांव निसबत गोपाळ गणेश दिंमत प्रतिनिधी गांव. बीतपशील.

१ कसबे उचण.
१ कसबे मपूर.
१ कसबे माशाल.
१ कसबे हिपरगे.

---

४ चार गांव येविशीं.

१ गोपाळ गणेश यांचे नांवें. सनद.
४ मोकदम देहाय यांस. पत्रें.

---

५

१ महाल निसबत सदाशिव व महिपतराव. बीतपशील.

१ परगणे येकदुणी.
१ परगणे मडसांगवी.

---

२ दोन महाल येविशीं.

१ सदाशिव महिपतराव यांचे नांवें. सनद.
२ जमीदारांस. पत्रें.

---

३

२ परगणे सिरढोण येविशीं.

१ आपाजी बाबाजी यांचे नांवें परगणे मजकुराविशीं. सनद.
१ जमीदारास. पत्रें.

---

२

२ मौजे कुकडगांव व मौजे देवगरे परगणे भुला येविशीं.

१ आपाजी गोपाळ पागा दिंमत राजश्री फडतरे यांस सदरहू गांवांविशीं.

१ मोकदम देहाय यास. पत्र.

२

३ महाल निसबत बाजी नारायण. बीतपशील.

१ परगणे अंतूर खेरीज मौजे भोर करून.

१ परगणे सुलतानपूर.

२ दोन महाल येविशीं.

१ बाजी नारायण यांचे नांवें. सनद.

२ जमीदारांस. पत्रें.

३

७६

शाहात्तर सनदा, व पत्रें मिळोन दिल्हीं असेत.

परवानगी रूबरू.

३५६–(११३१) धोंडो बल्लाळ पागा यांस कीं, पापण्णा पंडित निसबत नवाब निजाम अलीखां बहादर याणें महालानिहाय वगैरे येथें दंगा करून नुकसानी केली, यास्तव तुह्मीं त्यास धरून ठेविला आहे, त्यास तालुके बागलकोट व जालीहाल व नंदवाडगी येथील नुकसानीची याद आनंदराव भिकाजी रास्ते यांजकडील कमाविसदार तुह्मांस समजावितील त्याप्रमाणें पापण्णा पंडित यांजपासून ऐवजाचा फडशा करून देणें ह्मणोन. सनद १.

सीत तिसैन मया व अलफ जिल्हेज १६

रसानगी, त्रिंबक नारायण परचुरे कारकून निसबत दफ्तर.

---

(356) Pápanṇa Panḍit in the service of Nizám Alli invaded the Peshwá's territory and caused much loss in Tálukás Bágalkoṭ, Jálihál, and Nandwádgi. Dhonḍo Ballál arrested him. Dhonḍo was directed to recover the loss from him.

A.D. 1795-96.

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

## २१ जंजिऱ्याचा नवाब.

## नारो आपाजीच्या कीर्दीपैकीं.

३५७–( १६४ ) जंजिरकर शामल उंदेरीस येऊन बसणार, यास्तव प्रांत राजापुरी पैकीं हशमी माणूस चांगलें असामी १०० शंभर असामी बरकंदाज चांगलें, पत्र पावतांच लौकर रवानगी करणें, येविशींचा बयान एकंदर न लिहिणें. पत्र पावतांच लोकांची रवानगी करणें. जे क्षणीं पत्र पों-हचलें ते क्षणीं लोकांचे रोजमरे याची बेगमी करून उंदेरीस रवानगी करणें; आणि लोक पोंहचल्याचा जाब पाठविणें ह्मणून, चिमाजी माणकर प्रांत राजापुरी यांचे नांवें. छ. ८ जिल्काद.

खमस सबैन मया व अलफ मोहरम ६

सनद १.

परवानगी रूबरू.

३५८–( १६६ ) शामल जंजिरेकर याजविषयीं मामलेदारांस चिटणिसी. पत्रें.

खमस सबैन मया व अलफ मोहोरम ६

२ सरकारचा व शामलाचा तह जाहला आहे, त्याप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणू गुदस्तां तालुके मजकुरीं पत्रें सादर जहालीं आहेत; व हल्लीं हें पत्र साद केलें असे, तरी गुदस्तांचे पत्राप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन. पत्रें.

१ बाबूराव पासलकर तालुके बीरवाडी यांस.

---

## [ 1 ] POLITICAL MATTERS.

### ( b ) Matters relating to

### ( 21 ) Chief of Janjirá.

### FROM NÂRO APÂJI'S DIARY.

( 357 ) The Shámal of Janjirá having proceeded to Underi, orde were issued for sending 100 men to the place fro Pránt Rájpuri.

A. D. 1774-75.

( 358 ) The Mámlatdárs of Birwádi and Rájápuri were directed act up to the instructions issued in the preceding y for giving effect to a treaty concluded with the Shám of Janjirá.

A. D. 1774-75.

१ चिमाजी माणकर प्रांत राजापुरी.

२

२ नादगांव, व मुरुड वगैरे जंजिरे तर्फेच्या सावकारी सिबडीं व माहांगिऱ्या कोळ्यांच्या जंजिरे रेवदंडा येथील खांडींतून अष्टमीचे बंदरास सालाबाद येतात, त्यास तूर्त मुंबईची बंदी केली आहे, याकरितां हीं मना कराल तर न करणें, सुदामत चालीप्रमाणें येतील त्यांस येऊं देणें ह्मणोन. पत्रें.

१ आनंदराव शिंदे.

१ आनंदराव धुलप सुभा आरमारे.

२

४ चार पत्रें. छ. ९ जिल्काद.

३५९–( १८२ ) आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांस पत्र कीं, जंजिरकर यांणीं मुंबईहून नोरी गलबतें करून सोठे मुंबईस भरून जंजिरे यास घेऊन येत होते, ते माघारे जातां तुह्मीं धरून रेवदंड्यास नेलीं ह्मणोन विदित जाहलें, ऐशास जंजिरेकर यांचा व सरकारचा स्नेह, सबब बद्दल खातर सदरहू दोन गलबतें या खेपेस सोडून देणें. गलबतावर लोक असतील तेही सोडून देणें ह्मणोन चिटणिसी. पत्र १.

खमस सबैन मया व अलफ रबिलावल १६

३६०–( १८८ ) गणेशराम दातार यांचे नांवें कीं, अमारतपन्हा खानजा कुदखान जंजिरकर यांचे पुत्रास सरकारांतून सालमजकुरीं वस्त्रें व कंठी मोत्याची तुह्मांबरोबर पाठविली, त्याप्रमाणें तुह्मीं जंजिरेयास खानास प्रविष्ट करून पावतीची याद मोर्तबनसी छ. २९ जिल्काद सन मजकुरीं आणली. बीतपशील.

खमस सबैन मया व अलफ रबिलाखर ५

( 359 ) Two ships carrying rafters belonging to the Chief of Janjirá were caught while returning to Bombay by Ánandrao Scindia. Having regard to the friendly relations existing between Janjirkar and the Government, the ships were ordered to be released.

A. D. 1774-75.

( 360 ) Clothes and pearl-ornaments were sent as a present to the son of Amrat Panáh Khánjáhkud khán of Janjirá.

A. D. 1774-75.

| वस्त्रें. | | कंठी मोत्याची शहीत. | |
|---|---|---|---|
| १ | चिरा बादली. | ५३ | मोत्यें लोलक सु॥ |
| ·॥। ≈ | जामेवार. | ९ | गुजनी १ एकूण. |
| १ | वोढणी जरी. | १ | माणीक. |
| ·॥· | किनकाफ. | ८ | हिरकण्या. |
| ३।≈ | | | |

६२

दागिना.

एकूण सनगें सवा तीन तीन आणे, व कंठी मोत्याची शहीत बासष्ट एकूण दागिना एक सदरहू याद तुह्मीं आणून दिल्ही, ते दसरीं विल्हेस लागली असे. छ. २१ मोहोरम.

सनद. १

३६१-( २१० ) हावसी जंजिरेकर यांजकडील लोक मावळांत दंगा करावयास आले होते, त्यास त्या लोकांपैकीं कांहीं लोक किल्लेकरी गडकरी यांणीं धरून नेऊन अटकेस ठेविले आहेत ह्मणोन विदित जाहलें, त्यास गणेश राम दातार जंजिराहून हबशासीं बोलोन आले. पेशजींचा करार मावळांत त्यांजकडून उपद्रव होऊं नये ऐसा आहे तोच आहे. लोक आले ते गैरसमजानें आले, पुढें तिकडोन कोणी येऊन उपद्रव करणार नाहीं, याप्रमाणें निखालसतेनें सरकारांत विनंति केली; त्याजवरून जंजिरकरांकडील लोक धरोन तुम्हीं अटकेस ठेविले आहेत, ते सोडावयाचा करार करून पुण्यास आणविले आहेत, तरी त्यांजकडील लोक तुम्हीं अटकेस ठेविले असतील ते पुण्यास रवाना करणें म्हणोन, आनंदराव भिकाजी यांचे नांवें. सनद १.

सीत सबैन मया व अलफ जमादिलावल ८

(361) Some of the men of the Habsi of Janjirá, who had come to create a disturbance in Máwal were arrested by the officers of fort Korigad(Gadkaris?). Ganesh Rám Dátár interviewed the Habsi in the matter, and informed Government that the men went to Máwal through some misunderstanding, and that steps had been taken to prevent any such occurrence in future. The prisoners were therefore ordered to be set at liberty.

A. D. 1775-76.

३६२-( ५११ ) तालुके रायगड येथें शामल जंजिरकर याणें जमाव करून येऊन मुलकांत दंगा केला आहे, त्याचे बंदोबस्ताविशीं. सनदा.

तिसा सबैन
मया व अलफ
जमादिलावल १४

२ तालुके अंजणवेल, व रेवदंडा पैकीं लोक असामी २०० दोनशें पाठवावयाची आज्ञा करून हे सनद सादर केली असे, तरी सदरहू असामी यांस रोजमरा व अडसेरी बेगमी शामलाचा बंदोबस्त होय तोंपर्यंत करून देऊन, रघुनाथ सदाशिव यांजकडे तालुके मजकुरीं पाठवणें ह्मणोन. सनदा.

१ कृष्णाजी विश्वनाथ तालुके अंजणवेल त्यांस लोक असामी शंभर १००

१ आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांस लोक असामी १००

२

१ रघुनाथ सदाशिव तालुके रायगड यांस सनद कीं, माजी रायगडकरी, व माहाडकरी लोक नामजादीस तुह्मांकडून गेले आहेत, त्यां पैकीं असामी शंभर १०० तुह्मीं तालुके मजकुरीं आणून शामलाचा बंदोबस्त करणें, बंदोबस्त जहालियावर सदरहू शंभर १०० असामी जेथील तेथें माघारे पाठवणें ह्मणोन. सनद.

३

३६३-( ५७५ ) शामल जंजिरकर याणें रायगड तालुक्यांत चौथाई करितां उपद्रव केला आहे, येविशींचा बंदोबस्त जाला पाहिजे म्हणोन लिहिलें तें कळलें; त्यास शामलाकडील वकील बोलाऊन आणून त्याचें हरद्द मनास आणून पक्का तह होत असल्यास, तालुके मजकूरचे चार पांच हजार रुपये पर्यंत अंमल न करितां उचल्या हातें द्यावयाचें करून, दरम्यान मातबर माणूस

तिसा सबैन
मया व अलफ
रजब १

---

( 362 ) The Shámal of Janjirá having made an incursion into Táluká Ráygaḍ, arrangements were made to send additional force to the Táluká.

A. D. 1778-79.

( 363 ) The Shámal of Janjirá was troubling the people in Tarf Ráygaḍ for the recovery of the Chouthái Amal. The officer of Ráygaḍ was directed to invite the agent of the Shámal to a conference and to conclude a treaty with the Shámal, if he could be induced to relinquish his claim for a cash payment of Rs. 4,000 or Rs. 5,000 every year, to be paid by Government.

A. D. 1778-79.

घेऊन तह करणें, फिरोन रयतेस उपद्रव लागों नये; असें पक्कें जाहल्यास लिहिल्या अन्वयें करून हुजूर लेहून पाठवणें. सदरील प्रमाणें जाहल्यास शामलाचा दस्ताऐवज शिक्यानिशीं घेणें; आणि लौकर उरकणें ह्मणोन, रघुनाथ सदाशिव गद्रे यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

३६४–( ७०२ ) तालुके बीरवाडी निसबत बाबूराव पासलकर व भास्कर बल्लाळ यांजकडे तालुके मजकूर येथें शामलाचा दंगा जाहला आहे, सबब बेगमीस नक्त येवो(थो?)न शामलास द्यावयाकरितां पेशजी तुह्मांकडे रवाना केला, तो तुह्मांजवळ अमानत आहे, त्यापैकीं मशारनिल्हेकडे मुबदल्यास खर्चास तसलमातीस लिहून रुपये ३००० तीन हजार रुपये देविले असेत, तरी देऊन पावलियाचें कबज घेणें ह्मणोन, गोविंदराव व चिमाजी माणकर प्रांत राजपुरी यांस.

इसन्ने समानीन मया व अलफ रजब १२

सनद १.

रसानगी यादी.

३६५–( ७१८ ) रामचंद्र अनंत कारकून शिलेदार यांचें घर मौजे अवळस, तर्फ पौडखोरें येथें आहे, त्यास मावळांत शामलाची गडबड जाहली, त्याजकरितां मशारनिल्हेचे घरीं चौकशीस किल्ले कोरीगड पैकीं शिपाई असामी २ दोन, शामलाची गडबड आहे तोपावेतों देविले असेत, तरी सदरहू दोन शिपाई नेमून देणें. फारच गडबड जाल्यास त्यांचीं मुलें माणसें किल्यावर घेऊन राहावयास जागा करून देणें म्हणोन, आनंदराव भिकाजी यांस. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ सवाल १

परवानगी रूबरू.

३६६–( ७२५ ) जंजिरे दंडा राजपुरी येथील खोरीं नजीक सरकारचे लोकांसी व शामल जंजिरकर यांसीं लढाई जाहली, तेव्हां तालुके बीरवाडी व अवचितगड येथील लोक जखमी, व वार जाहले, त्यास खर्चास खेरीज कबज. रुपये.

इसन्ने समानीन मया व अलफ जिल्काद ४

१२ विठोजी नाईक पारटे खुद्द सरदार अवचितगड पैकीं ठार जहाला, सबब कफनास व दिवसांबद्दल.

---

( 364 ) There was a disturbance of the Shámal in Táluká Birvádi.
A. D. 1781-82.

( 365 ) There being a disturbance of the Shámal in Máwal, 2 persons were ordered to be sent from Korigaḍ to protect the house of Rámchandra Anant Kárkun, at Awalas in Tarf Paud Khore.
A. D. 1781-82.

( 366 ) A battle was fought between some men of Government and the Shámal Janjirkar, near Daṇḍá Rájpuri.
D. D. 1781-82.

२० तालुके बीरवाडी पैकीं जखमी जहाले, त्यास जखमेबद्दल खर्चास. रुपये.

१९ भगवंतराव विचारे दिंमत माधवराव गुजर यांस उजवे पायाचे गुडग्यास गोळी लागोन हाड फुटोन पार जहाली सबब. रुपये.

९ शिवाजी जखाते दिंमत खास बारदार यासी टीरीवर गोळी लागोन चाटून गेली सबब.

---

२०

---

३२

एकूण बत्तीस रुपये देविले असेत, तरी तालुके बीरवाडी पैकीं देऊन सदरहूप्रमाणें तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें, मजुरा पडतील ह्मणोन, बाबूराव पासलकर व भास्कर बल्लाळ यांस. सनद १.

रसानगी यादी.

३६७–( ७३६ ) शामल जंजिरकर याजकडील चाकरमाने लोक त्याजकडून फुटोन येतील त्यांस आणणें; ह्मणजे शत्रूची जड कमी होईल ह्मणोन आज्ञा जहाली होती; त्याजवरून शंभर सवाशें माणूस फुटोन आलें आहे, त्याच्या तैनाता करून प्रांत राजपुरी येथें चाकरी द्यावयाची आज्ञा जाली पाहिजे ह्मणून, तुह्मीं हुजूर विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें; त्याजवरून हे सनद सादर केली असे, तरी शामलाकडील जे लोक आले असतील त्यांस पक्का जामीन घेऊन प्रांत मजकूरचे शिरस्तेप्रमाणें तैनाता माणूस पाहून करून चाकरी घेणें, तेथें उपयोग असेल तोपावेतों ठेऊन अट(ड)शेरी देणें, पुढें हुजूर पाठवणें ह्मणोन, गोविंदराव व चिमाजी माणकर यांस. सनद १.

इसन्ने समानीन मया व अलफ मोहरम ११

रसानगी यादी.

३६८–( ७९६ ) याकुपखान शामल जंजिरकर याचे लेकाचें लग्न आहे, सबब त्याज-

---

( 367 ) Govindrao and Chimnáji Mánkar were formerly directed to gain over the followers of Shámal Janjirkar. About 100 or 125 men were thus gained over, and permission was granted to their employment under Government in Piánt Rájpuri.

A. D. 1781-82.

( 368 ) Bhikáji Govind Thosar was sent with a present of clothes

सलास समानीन मया व अलफ जमादिलाखर १६

कडे सामान न्यावयास भिकाजी गोविंद ठोसर यांस आज्ञा केली आहे, तरी मशारनिल्हे तुह्मांस लिहितील त्याप्रमाणें दोनशें रुपये किमतीचें सामान तालुके रेवदंडा पैकीं पावतें करून हिशेबीं खर्च लिहिणें ह्मणून, आनंदराव शिंदे यांचे नांवें. सनद १.

रसानगी, भिकाजी गोविंद ठोसर.

सबा समानीन मया व अलफ जिल्काद १५

३६९–( ९३२ ) सरकारचा व जंजिरकराचा तह सालगुदस्तां जाहला, त्यास जंजिरकराचे अंमलदार सरकारचे महालीं राहतील त्यांस लांकूड फांटें व शाखभाजी व पानपत्रावळ सुदामत चालीप्रमाणें देणें, व सरकारचे अंमलदार जंजिरकराचे महालीं राहतील त्यांस सदरहूप्रमाणें ते देतील; नवीन कटकट करून दिकत न करणें, येविशीं तुह्मी आपले कडील अंमलदारांस ताकीद करणें ह्मणोन, गोविंदराव माणकर प्रांत राजपुरी यांचे नांवें चिटणिसी. पत्र १.

सबा समानीन मया व अलफ जिल्काद १६

३७०–( ९३३ ) सरकारचा व जंजिरकरांचा तह सालगुदस्तां जाहला, त्यास तालुकेहाय येथील कमाविसीची वैवाट पेशजींचे सुदामत चालीप्रमाणें परस्परें इतल्यानें करीत जाणें ह्मणोन, मामलेदार तालुके हाय यांस चिटणिसी. पत्रें.

१ सदाशिव रघुनाथ तर्फ रायगड यांस कीं, तालुके मजकूर येथील बेगमीस तर्फ गोरेगांव पैकीं नऊ गांव, व तर्फ निजामपूर पैकीं तीन गांव एकूण बारा गांव आहेत, त्यास गोरेगांवीं व निजामपुरीं दुतर्फाचे अंमलदार राहतात, तेथें तुह्मांकडील कमाविसदारांनीं राहून सदरहू गांवचे कमाविसीची वैवाट पेशजीचे सुदामत चालीप्रमाणें करीत तें करणें येविशीं.

१ बाबूराव पासलकर तालुके बीरवाडी यांस कीं, जंजिरकरांकडील अंमलदार मौजे

---

A. D. 1782-83.

worth Rs. 200 in connection with the marriage ceremony of a son of Yákudkhán Shámal Janjirkar.

A. D. 1786-87.

( 369 ) A treaty was concluded between Government and the Janjirkar in the preceding year. It was therefore ordered that officers of Government should supply officers of the Janjirkar living in Government territory, with fuel, vegetable &c, as usual without obstruction.

A. D. 1786-87.

( 370 ) It was further ordered that the Government officers of Táluká Ráygad, Birwádi, Rewadandá, and Rájapuri should administer the villages in the revenues of which the Janjirkar had a share conjointly with the officers of the Janjirkar.

सिलोसी, तर्फ मजकूर येथें राहतात, तेथें तर्फ मजकूर येथील महालकरी यांणीं राहून सुदामत चालीप्रमाणें कमाविसीची वैवाट करीत जावी, याप्रमाणें ताकीद करून करवणें येविशीं.

१ आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांस कीं, परगणा घोसाळें पैकीं आठ गांव तर्फ मजकूरचे बेगमीस आहेत, ऐशास सरकारचे, व जंजिरकरांकडील अंमलदार रोह्यास राहतात, तेथें तुह्मीं आपलेकडील कारकून ठेऊन कमाविसीची वैवाट पेशजीच्या सुदामत चालीप्रमाणें जंजिरकरांचे इतल्यानें करीत जाणें येविशीं.

१ गोविंदराव माणकर प्रांत राजपुरी यांस कीं, दुतर्फा अंमल चालला पाहिजे. याजकरितां मामले तळें येथील महालकरी यांणीं, मौजे चरईस जंजिरकरांकडील अंमलदार राहतात तेथें राहोन, कमाविसीचा अंमल पेशजीच्या सुदामत चालीप्रमाणें करीत तें करणें येविशीं.

---

४ चार पत्रें दिल्हीं असेत.

**३७१-( ९३४ ) सरकारचा व जंजिरकराचा तह जाहला, त्यास तालुके हाय वगैरे येथून चालवावयाचीं. कलमें.**

सबा समानीन
मया व अलफ
जिल्काद १७

सन सीत समानीनांत छ. २२ जिल्हेजीं तह जाल्या अलिकडे गलबतें, व माहांगिऱ्या व डंग्या व बतेले वगैरे धरिलीं असतील तीं परस्परें सोडावीं, याप्रमाणें करार ठरला आहे, त्यास सरकार तालुकियांतील गलबतें व महांगिऱ्या व डंग्या व बतेले वगैरे जंजिरकरांनीं धरिलीं असतील तीं जंजिरकर सोडून देतील;

जंजिर तर्फेचीं गलबतें, व जाफराबाद जंजिरकरांकडील या बंदरांचीं गलबतें समुद्रांत वैवाट करितील, त्याजवर जंजिरकराचें दस्तक असेल त्यास सरकारचे आरमारकरी यांणीं छडाछड करूं नये, व सरकारचे तालुके हायचीं गलबतें वगैरे सावकारी गलबतें यांजवर सरकाचें दस्तक असेस त्यास जंजिरकर यांचे आर-

---

(371) It was agreed in a treaty between Government & Janjirkar that ships belonging to Janjirkar or possessing his permit should not be molested by the ships of Government, and that they should be allowed to trade with the Government territory on payment of the usual taxes, and that shi[illegible] belonging to the Janjirkar captured by Government vessels after 22nd of Jillej in A. D. 1785/86, the date of the treaty, should restored to the Janjirkar and vice versa.

A. D. 1786-87.

आणि भिकाजी गोविंद तुह्मांस लिहितील तेव्हां जंजिर तर्फेची गलबतें, व माहांगिऱ्या व डंग्या, व बतेले वगैरे बंदर जंजिरा व जाफराबाद येथील तुह्मीं धरिलीं असतील तीं सोडून देणें. कलम १.

सन सबा सलासीनांत तह जाहला, त्यांतील कलमें जंजिरेकरांचे खासगी तरांडे सरकारच्या बंदरीं व्यापारास आले तरी त्यांचा हांसील सरकारांत घेऊं नये याप्रमाणें करार आहे, परंतु जंजिरकरांकडील खासगत तरांडी सरकारच्या बंदरीं उदमास आजपर्यंत आलींच नाहीं, यास्तव सुदामत चालत आल्याप्रमाणें चालणें, नवीन न करणें. कलम १.

मारकरी यांणीं छडाछड करूं नये. सावकारी गलबतें जंजिरकरांकडील सरकारच्या बंदरीं व्यापारास आलीं, तरी शिरस्तेप्रमाणें हांसील सरकारांत द्यावा, सरकारच्या बंदरींचीं गलबतें, व सावकारी जंजिरकरांचे बंदरीं व्यापारास गेलीं, तरी शिरस्तेप्रमाणें हांसील त्यांस द्यावा. सुदामत चालत आल्याप्रमाणें चालणें, नवीन न करणें. कलम १.

एकूण तीन कलमें सदरहू लिहिल्याप्रमाणें करणें ह्मणोन चिटणिसी पत्रें.

१ गंगाधर गोविंद तालुके विजयदुर्ग यांस.
१ महिपतराव कृष्ण तालुके रत्नागिरी यांस.
१ त्रिंबक कृष्ण तालुके अंजनवेल यांस.
१ मोरो बापूजी तालुके सुवर्णदुर्ग यांस.
१ आनंदराव शिंदे तालुके रेवदंडा यांस.
१ माहादाजी कृष्ण तालुके उंदेरी यांस.
१ आनंदराव धुलप आरमार विजयदुर्ग यांस
———
७

सात पत्रें दिलीं असेत.

सबा समानीन मया व अलफ रबिलाखर १०

३७२-( ९४२ ) सरकारचा व जंजिरकराचा तह छ. २२ जिल्हेज साल गुदस्त सनसीतांत ठरावांत आला, तोपर्यंत सरकारचे लोक मतगडास व जंजिरकराचे महालीं होते, त्यास जंजिरकरांकडून आदा जहाला, व सिदी जमरूद सरकारांत आले, त्यास सरकारांतून आदा जहाला, तो परस्परें मागों नये. पुढें लोक ठाणीं दुतर्फा बसत तों महिना पंधरा रोज लागतील, त्यास पर

A. D. 1786-87.

( 372 ) In the treaty concluded with the Janjirkar, on the 22nd of Jillej in the preceding year, it was settled that the Janjirkar should bear the expenses incurred by him on account of the Peshwá's men at Matgad &c. and that the Peshwá should bear the expenses incurred by him on account of Siddhi Jamrud living under his protection.

स्पर्ें आदा होईल तो द्यावा घ्यावा, याप्रमाणें गुदस्तां करार जाहला आहे, त्यास मतगडास सरकारचे लोक राहिले, त्यास सिदी जमरूद यांजकडून तुह्मांकडील लोकांस पावती जहाली आहे, त्याचा हिशेब तुह्मीं पाठविला, त्यापैकीं जंजिरकरांकडे द्यावयाचे. बेरीज.

नक्त रुपये ७१३ भात कैली खंडी ३८॥=

एकूण नक्त सातशें तेरा रुपये, व भात कैली पावणे एकूण चाळीस खंडी दोन मण जंजिरकरांकडे द्यावयाचा करार करून, हे सनद सादर केली असे, तरी तुह्मांकडे मतगडाकडील नक्त व गला पावला आहे, त्या ऐवजीं सदरहूप्रमाणें पावते करून पावलियाचें कबज घेणें ह्मणोन, गोविंदराव माणकर यांस. सनद१.

रसानगी यादी.

३७३-( १०३५ ) परगणा सत्रागांव, प्रांत गुजराथ येथील मुलाणाचे गांव खेरीज करून अमलाची कमावीस तुमच्याकडे होती, ते दूर करून खान अजम सिदी अबदूल करीम याकुपखान हबसी जंजिरकर यांजकडे करार करून देऊन, हे सनद तुह्मांस सादर केली असे, तरी परगणा मजकूरचा अंमल ठाण्यासुद्धां मशारनिल्हेचे हवालीं करून कबज घेणें ह्मणोन, मनोहर त्रिंबक यांचे नांवें. सनद १.

इहिदे तिसैन मया व अलफ रमजान २५

येविशीं जमीदार परगणा मजकूर यांस कीं, रुजू होऊन अंमल सुरळीत देणें ह्मणोन. सनद १.

२

रसानगी यादी.

३७४-( १०३६ ) बाळुमिया शामल जंजिरकर यांचे भाऊ छोटे मिया, व सिदी इसुफ, व त्यांजबरोबरील माणसें असामी सात ताल्लुके रायगड येथें अटकेंत ठेविले आहेत, त्यास जरा बजरासुद्धां हुजूर पाठऊन देणें ह्मणोन तुह्मांस सनद सादर जहाली; त्याजवरून तुह्मीं छोटे मिया, व सिदी इसुफ व त्यांजबरोबरील माणसें सात एकूण असामी ९ नऊ यांस जरा बजरासुद्धां पाठविले ते हुजूर पावले असेत ह्मणून, सदाशिव रघुनाथ ताल्लुके रायगड यांचे नांवें. सनद१.

इहिदे तिसैन मया व अलफ रमजान १६

परवानगी रूबरू.

---

( 373 ) The Parganá of Satrágaum in Gujrath excepting certain villages was ordered to be made over to Khán Azam Siddhi Abdul Karim Yákudkhán Habshi of Janjirá.

A. D. 1790-91.

( 374 ) Chhotemîyá and Siddhi Esuf, brother of Báḷumîyá Shámal of Janjirá, and others who were prisoners at Ráyagaḍ were ordered to be brought to Poona and handed over with all their effects to Bahirao Raghunáth Mehendaḷe.

A. D. 1790-91.

सदरहू नऊ असामी यांस जरा बजरासुद्धां बहिरो रघुनाथ मेहेंदळे यांचे हवालीं केले असेत.

३७५–( १०५० ) तालुके रायगड येथें शामलाचा दंगा आहे, त्याचे बंदोबस्तास नवे लोक ठेविले पाहिजेत, याजकरितां लोक ठेवावयाची आज्ञा जाली पाहिजे ह्मणोन तुह्मीं विनंति केली; त्याजवरून दंग्याचे बंदोबस्ता करतां हशमी लोक असामी ४० एकूण दरमहा दर असामीस शेरा रुपये ५ पांच प्रमाणें खेरीज शिरस्त्याचे लोक जदीद तालुके मजकुरीं ठेऊन शामलाचे दंग्याचा बंदोबस्त करणें; आणि लोकांचा आकार होईल तो तालुके मजकूरचे हिशेबीं खर्च लिहिणें ह्मणोन, सदाशिव रघुनाथ तालुके मजकूर यांचे नांवें. सनद १.

सलास तिसैन मया व अलफ सवाल २९

रसानगी याद.

३७६–(१०९१) सिदी अबदूल करीम खान शामल जंजिरकर यांस पाऊण लक्षाची जहागीर सरकारांतून लाऊन द्यावयाचा करार आहे, त्यापैकीं परगणे सत्रागांव येथील साठ हजार रुपयांची बेरीज लाऊन दिल्ही, बाकी पंधरा हजार रुपयांचे गांव लाऊन द्यावयाचे, त्यास परगणे पारचोल पैकीं देहे.

आर्बा तिसैन मया व अलफ जमादिलावल ३०

बीतपशील.

| | |
|---|---|
| १ मौजे वासण. | १ मौजे सरई खुद. |
| १ मौजे कोथा. | —— |
| १ मौजे करोड कोटवा. | ४ |

एकूण चार गांव येथील इस्तकबिल सन अर्बा समानीन सन तिसैन सात साला व इंग्रजाचे कारकीर्दी पूर्वील सरकारअमलांतील तीन साला, एकूण दहा साला पटी पटीयांत सुद्धां कचे आकाराची चौकशी करून त्यापैकीं भरसालची बेरीज लाऊन द्यावयाची, त्यास भरसाल सन सबा समानीन ( दोन ओळी फाटल्या ) पासून शामलाकडे गांव लाऊन द्यावयाचा ठराव केला असे, तरी दहा सालांपैकीं भरसालची बेरीज असेल ती व बाकी तगाई कमाविसदार यांची गांवांकडे येणें असेल त्याची रुजवात, तुह्मीं पांडुरंग राम कारकून पाठविले आहेत यांचे, व शामलाकडील कारकून यांचे विद्यमानें करून, गांव हवालीं करणें

( 375 ) There being a disturbance by the Shámal in Táluká Ráyagad, additional men were ordered to be entertained.
A. D. 1792-93.

( 376 ) A Jahágir worth Rs. 75,000 was agreed to be granted to Siddhi Abdul Karim Khán of Janjirá. A territory worth Rs. 60,000 was given in Pargaṇá Satrágaum ( सत्रागांव ). The villages of Wásaṇ, Kothá, Karod, Kotwá, Sarai khud were now given to make up the remaining 15,000 Rs.
A. D. 1793-94.

लाऊन घेणें, व बाकी तगाईचा ऐवज ठरेल तो वसूल घेऊन ज्या कमाविसदाराचे कारकी- र्दीचा असेल त्याजकडे देणें ह्मणोन, हरी चिंतामण सरसुभा प्रांत गुजराथ यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

---

# १ राजकीय.

## ( ब ) इतर माहिती.

## २२ हैदरअल्ली व टिपू.

३७७-( १०८ ) सुपे प्रांतीं हैदरखानाचा दंगा आहे, ठाण्याचा बंदोबस्त जाहला पाहिजे, ह्मणोन शिवाजी बाबाजी ह्मसकर यांणीं हुजूर विनंति केली, व सौधकर सवस्थानिक यांस मुलें माणसें ठेवण्यास जागा नाहीं, त्याणें (त्यामुळें) ठाणें सुपें त्यांचे हवालीं केल्यास ठाणें राखितील. मुलकी वसूल आप- ला कारकून ठेऊन घ्यावा, याप्रमाणें सवस्थानियांसी बोलून ठेविलें आहे ह्मणोन तुह्मीं म- शारनिल्हेस लिहिलें; त्याजवरून ठाणें मजकूर सौधकर संस्थानिकांकडे तसलमातीस देविलें असे, तरी तुह्मीं आपली खातरजमा करून घेऊन ठाणें हवालीं करणें. ठाण्याचे शिबंदी- ची नेमणूक पेशजीं तुह्मांस करून दिल्ही आहे, त्याप्रमाणें त्यांजकडे नेमून देऊन ठाणें मजबुदीनें राखणें. मुलकी वसुलास तुह्मीं आपला कारकून ठेऊन वसूल घेऊन सरकार हि- शेबीं जमा करणें ह्मणोन, वेंकटराव नारायण यांचे नांवें. सनद १.

सबा सबैन मया व अलफ जमादिलाखर ७

परवानगी रूबरू.

३७८-( ४६४ ) कमासविस भेट राजश्री राव यांस बद्दल हैदरखान संस्थान श्रीरंगप- ट्टण यांजकडून वकील वस्त्रें घेऊन आले ते जमा, गुजारत जानोजी जाबक खिजमतगार सनगें एकूण किंमत. रुपये.

समान सबैन मया व अलफ जमादिलावल

---

# [ 1 ] POLITICAL MATTERS.

## ( b ) Matters relating to

## ( 22 ) Haidar Alli and Tippoo.

( 377 ) Haidar Khan having created a disturbance in Prànt Supá, the Thaṇá of Supá was, at the request af Shiwáji Bábáji, ordered to be entrusted to the Sansthánik of Soudh for being well guarded.

A. D. 1776-77.

( 378 ) Clothes worth Rs. 205 were received as a present from Haidarkhán of Sansthán Shrírangapattaṇa.

A. D. 1777-78.



| | | |
|---|---|---|
| २५ | चिराबादली | १ |
| १२० | जामेवारे. | |
| | ६० प्रत | १ |
| | ६० प्रत | १ |
| | १२० | २ |
| २० | पटका बादली | १ |
| ४० | किमखाप | १ |
| २०५ | | ५ |

३७९-( ५३० ) कमाविस जप्ती बद्दल कारकून दिंमत मानाजी शिंदे यांणीं मानाजी शिंदे यांच्या फितुरांत मिळोन हैदरखानाकडे गेले, सबब त्यांची वस्तभाव घरें वगैरे जागा सांपडली ते गंगाधरराव गोविंद यांणीं जप्त करून हुजूर पाठविली, त्यापैकीं कापड सनगें जमा गुजारत गंगाधर सदाशिव कारकून दिंमत गंगाधरराव गोविंद आंखाचे निमे नक्त जमा. रुपये.

समान सबैन मया व अलफ सफर २९

९६३॥ बरहुकूम बाळाजी रघुनाथ वस्ती मौजे वाटेगांव प्रांत कराड दिंमत शिंदे मजकूर यांची वस्तभाव मौजे मजकुरीं सोनाराचे घरीं सांपडली त्यापैकीं सनगें एकूण किंमत. रुपये.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २८ | तिवटें | ३ | ७॥ | दुपटा छिटी बऱ्हाणपुरी | १ |
| ३० | जाफरखानी | ० | १७॥ | लुगडीं साधीं | ३ |
| २९ | शेले साधे | ३ | १२॥ | जामेवार | १ |
| ८७॥ | धोत्रजोडे | ३ | ९० | किंमखाप | १ |
| ३० | पासोडी कळसपाकी | २ | ९ | बांदरी छिटें रजे सनंग | ८≡ |
| १२॥ | ताडपत्री जुनी | १ | ४० | पायजामे व तुंबे | ४ |
| १७॥ | गजनी | १ | ४० | महमुद्या | ५ |
| ६ | खण हरजिनसी | ८ | ७॥ | पातळ साधें धुवट | १ |
| १ | चोळखण गजनीचा | १ | ३५५ | शाला फर्द | १४ |
| १ | बासनें छिटी जुनीं | २ | ४९ | पितांबर मर्दानी | २ |
| १२॥ | झगा | १ | ३७॥ | जाफरखानी छिटी बऱ्हाणपुरी | ।॥ |
| ५५ | तिवटें | ४ | | | |
| | | | ९६३॥ | | ६३॥≡ |

( 379 ) Báláji Raghunáth Karkoon joined in the Conspiracy of Mánáji Scinde and went over with him to the side of Haidar Alli, his house was therefore attached.

A. D. 1777-78.

९०॥। बद्दल अबाजी भटंभट सप्रे वस्ती कसबे रहिमतपूर प्रांत वाई.

३८०-( ५४९ ) परगणे धारवाड येथील पेठ, व कसबा हैदर नाईक यांचे दंग्यामुळें लुटला गेला, याजकरतां देशमुख, व देशपांडे यांजकडे दरसाल ऐवज सुभाहून करार होत असतो, तो एक साला आबादानी होण्याकरितां माफ केला असे, तरी एक साला ऐवज देशमुख व देशपांडे यांजपासून न घेणें; व रयतेस कौल देऊन अबादानी करणें ह्मणोन, त्रिंबकराव यशवंत यांचे नांवें. छ. २९ सफर.

समान सबैन मया व अलफ सफर २६

सनद१.

रसानगी यादी.

३८१-( ९८० ) तुह्मांस चिकोडी प्रांतांत बंदोबस्तास पाठविलें आहे तेथील कलमें.

तिसा सबैन मया व अलफ रजब २४

हैदर नाईकानें ठाणीं, व गांव घेतले असतील ते सोडावयाची आज्ञा तुह्मांस केली असे, तरी ठाणीं व गांव घेऊन इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून ऐवज सरकारांत पावता करून पावलियाचा जाब घेत जाणें. कलम १.

हैदर नाईकाकडे व येसाजी शिंद्याकडे लोक गेले असतील, त्यांची चवकशी करून घरें जप्त करणें. लोक गेले असतील ते उठऊन आणवणें, व जप्तींत सांपडेल तें सरकारहिशेबीं जमा करणें. कलम १.

परगणा राहुरी, व परगणा रायबाग, व कागल वगैरे गांवांपैकीं गांव सरकारांत आहेत तेथील ऐवज सरकारांत येतो, ते गांव खेरीज करून इनामदार व जमीदार यांजकडे दुमाले गांव सदरहू परगण्यापैकीं असतील तेथील घांसदाणा गांव पाहून घेणें; आणि ऐवज येईल तो सरकारहिशेबीं जमा करणें. कलम १.

( 380 ) The Peth and Kasbá in Parganá Dhárwár were pillaged during the revolt of Haidar Naik.
A. D. 1777-78.

( 381 ) Bacháji Vishvanáth was sent into the province of Chikodi with instructions to recover any Thánás or villages taken by Haidar Naik and to attach the property of persons who might be found to have gone over to him or to Yesáji Scindia.
A. D. 1778-79.

एकूण तीन कलमें करार करून दिल्हीं असेत, तरी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें म्हणोन, बच्याजी विश्वनाथ यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

३८२–( ६२९ ) कमाविस भेट सनगें एकूण किंमत. रुपये.

समानीन मया व अलफ जमादिलाखर २३

५९९ राजश्री राव यांसी बाबत हाय गुजारत जानाजी जावक खिजमतगार.

३९२ बाबत शरफत दौला.

| | |
|---|---|
| १७ चिरा बादली | १ |
| १५ पटका बादली | १ |
| ५ गोषपेंच बादली | १ |
| ८० जामेवार बादली | २ |
| १९० शाला थिर्के | २ |
| १२५ किमखाप | १ |
| ३९२ | ८ |

२०३ बाबत नाईक यांजकडून नरसिंगराव वकील वस्त्रें घेऊन आले तीं.

| | |
|---|---|
| १८ चिरा बादली | १ |
| १३ पटका बादली | १ |
| ७२ जामेवारे जरी | २ |
| १०० किमखाप | १ |
| २०३ | ५ |

| | |
|---|---|
| ५९५ | १३ |
| ० लंग. | |
| ५९९ | १३ |

( 382 ) Clothes worth Rs. 392 and Rs. 203 were received as presents from Sharáfat Doula and Haidar Naik respectivly.

A. D. 1779-80.

## दादासाहेबांच्या कीर्दीपैकीं.

३८३-( ६७० ) नवाब हैदर अल्लीखान बहादूर यांचे नांवें पत्र कीं, तुह्मांकडील सरकारांत खंडणीच्या ऐवज पैकीं भरणा.

समानीन
मया व अलफ
मोहरम १२

४००००० हुजूर.

२००००० मार्फत भुकनजी देव सावकार. रुपये.

१००००० कित्ता हुंडी.

१००००० कित्ता हुंडी.

२०००००

इंग्रजी जहाजावरी पाठविले.

१००००० कित्ता.

१००००० कित्ता.

२०००००

४०००००

सदरहूच्या पावत्या अलाहिदा दिल्या असेत.

९९४९९२। गुजारत बाजीराव गोविंद.

७००००० कित्ता.

२९४९५२। मशारनिल्हेच्या खर्चाबद्दल.

९९४९५२।

### FROM THE DÂDÂSÂHEB'S DIARY.

( 383 A letter was sent to Nawáb Haidar Allikhán acknowledgi
A. D. 1779-80. receipt of the following amounts of tribute sent by l

Rs. 200,000 Through Bhukanji Dewa sávkár.
Rs. Do Sent by Haidarkhán on board an lish ship.
Rs. 994,952-4. Through Bájirao Govind.
Rs. 498,142-10. To be received from Mánáji

18,93,094-14

४९८१४२॥= मानाजी शिंदे यांजकडे.

१८९३०९४॥=

एकूण अठरा लक्ष ऱ्याणव हजार पावणे पंच्याण्णव रुपये दोन आणे, इस्तकबिल सन अर्बा सबैन तागाईत सुर सन समानीन सदरहूप्रमाणें ऐवज सरकारांत पावला असे म्हणोन, मशारनिल्हेच्या नांवें. छ. ४ मोहरमचें. पत्र.

३८४-( ७७६ ) जमा जामदारखाना.

सलास समानीन मया व अलफ मोहरम २०

कमाविसभेट राजश्री राव यांसी बाबद नवाब हैदर अल्लीखान बहाद्दर यांणीं कृष्णराव नारायण जोशी यांजबरोबर पोशाक पाठविले ते, गुजारत जिवाजी काटकर खिजमतगार सनगें एकूण. रुपये.

| | | |
|---|---|---|
| ५१ | चिरे जरी बादली कारचोबी सोनेरी | २ |
| २०७ | जामेवार जरी बादली कारचोबी | ४ |
| ४२ | पटके जरी बादली | २ |
| २९० | शाला थिर्के | ६ |
| २६५ | किमखाप | ५ |
| ७० | तिवटें छिटी बराणपुरी | ३ |
| १३० | जामेवार छिटी बराणपुरी | ६ |
| १९५ | जाफरखानी छिटी बराणपुरी | ३ |
| १२५० | | ३१ |

३८५-( ८३१ ) जमा जामदारखाना.

कमाविस भेट सनगें एकूण रुपये.

आर्बा समानीन मया व अलफ जिल्हेज २७

कर्ज गुजारत कृष्णराव नारायण जोशी सन इहिदे समानीनांत मशारनिल्हे यांस नवाब हैदर अल्लीखान यांजकडे पाठविले होते, त्यास मोघम पोशाकाचीं सनगें सरकारांतून समागमें दिल्हीं होतीं; त्याशिवाय तेथें मशारनिल्हे यांणीं कापड खरेदी केलें, तें इस्तकबील छ. ६ रविलाखर सन इहिदे समानीन तागाईत छ. ६ मोहरम सलास बरहुकूम हिशेब मखलासीचा सनगें एकूण किंमत. रुपये.

---

(384) Clothes worth Rs. 1,250 were received as presents from Nawáb Haidar Allikhán Bahádur.
A. D. 1782-83.

(385) Krishnrao Náráyeṇ Joshi was sent to Nawáb Haidar Allikhán in A. D. 1780/81.
A. D. 1783-84.

| | |
|---|---|
| १११ जामेवारे छिटी बऱ्हाणपुरी | ६ |
| ६६ महमुद्या | ४ |
| ६२॥ किमखाप | १ |
| ७३ शाला फर्दे | ३ |
| ६६ तिवटें | ४ |
| ३७८॥ | १८ |

## हरी बल्लाळच्या कीर्दीपैकीं.

३८६–( ९४४ ) सरकारचा व नवाब हैदर अलीखान बहादर यांचा पेशजीं तहनामा सन ११९३ विकारीनाम संवत्सरे छ. १० सफरीं मदारुल माहाला, बाळाजी जनार्दन व हरी बाळाजी व महादजीराव शिंदे व आनंदराव भिकाजीराव रास्ते व कृष्णराव बल्लाळ यांचे विद्यमान शफत बेलभंडारपूर्वक जहाला आहे, तोच सही व दुरुस्त असे, त्यांत तफावत दोहींकडून होऊं नये; कधीं काळो बहिरव किल्ले नरगुंद याचे हरकतेकडून हरदु सरकारची नाखुशी जहाली होती, त्यास तुह्मांकडून बदरुदी जमाखान बहादर व अलीरजा, तुकोजीराव होलकर व गंगाधरराव भिकाजीराव रास्ते यांजकडे येऊन दोहीं सरकारची दोस्ती पेशजींचे तहनाम्याप्रमाणें चालावी ह्मणोन बोलणें जहालें; त्याजवरून मदारुल माहाला, बाळाजी जनार्दन व हरी बल्लाळ व तुकोजीराव होळकर व गंगाधरराव भिकाजीराव रास्ते दरम्यान येऊन पेशजींचा तहनामा शपतपूर्वक जहाला आहे, तोच करार केला असे, पूर्वीं जाजती दोस्ती

सबा समानीन मया व अलफ जमादिलावल १७

## FROM THE HARI BALLÂL'S DIARY.

( 386 ) A treaty was formerly entered into with Nawáb Haidar Allikhán Bahádur through Báláji Janárdan, Hari Ballál, Mahádjirao Scindia, Anandrao Bhikájirao Ráste, and Krishnarao Ballál. After that treaty some misunderstanding arose between the 2 Powers owing to the conduct of Kálo Bahirao of fort Nargund. Tipu Sultán now sent Badrudin Jamálkhán Bahádur and Alli Rajá to Tukojirao Holkar and Gangádharrao Bhikájirao Ráste to propose that the 2 Governments should continue on terms of friendship according to the original treaty. The original treaty was accordingly ratified. The tribute had remained in arrears for the 4 years, at the rate of Rs. 12 lacs a year. The net amount due on this account was proved to be Rs. 45 lacs to the satisfaction of Badru Jamákhán Bahádur and Alli Rajá. Tipu was requested to remit it as also the amount of tribute for the year A. D. 1786/87 in the month of Shrávan and to pay the amount every year at Poona in future.

A. D. 1787-88.

व रफायतखान खुलासी अमलांत येईल. पेशकसीचा ऐवज इस्तकबिल सन सलास समानी तागाईत सन सीत समानीन सन ११९९ हिजरी विश्वावसुनाम संवत्सरे पावेतों दरसा बारा लक्ष रुपये प्रमाणें चौसाला अठेचाळीस लक्ष रुपयांचा फैसला बदरु जमाखान बहाद व अलीरजा याचे मारफतीनें जहाला. सन सबा समानी(न) पराभव संवत्सरचा पेशकसीच ऐवज बारा लक्ष रुपये श्रावणमासीं पुण्यांत नक्त पावते करावे. पेस्तर सालापसून पेशकसीच ऐवज बारा लक्ष रुपये दरसाल पुण्यांत सालाचे सालांत नक्त देत जावे. येणेंप्रमाणें टि सुलतान बहादर यास लिहून दिल्हा असे. करारनामा १.

रसानगी यादी.

३८७-( ९४५ ) सरकारचे पेशकसीचा ऐवज नवाब टिपू सुलतान बहादर यांजको येणें, त्याचा वगैरे फडशा करून द्यावयाचा बदरु जमाखान बहादर अलीरजा यांचे मारफतीनें ठरला तितका पराभवनाम संवत्सरे सन १२० हिजरी.

सबा समानीन मया व अलफ जमादिलाखर १७

कलमें.

पेशकसीचा ऐवज तागाईत सन सीत समानीन पर्यंत नक्त रुपये.

१२०००० सन सलास समानीन शके १७०४ शुभकृत् संवत्सर सन ११९६ हिजरी.

१२०००० सन आर्बा समानीन शके १७०५ शोभकृत् (शोभन?) संवत्सर सन ११९७ हिजरी.

१२०००० सन खमस समानीन शके

सालमजकूर सन सबा समानीन पराभ संवत्सरेचे बारा लक्ष रुपये पेशकसीचे येणे ते श्रावणमासीं पुण्यांत नक्त पावते करावे पेस्तर सन समान छवंगनामसंवत्सरे स हिजरी १२०१ यापासून दरसाल बारा लक्ष रुपये प्रमाणें सालाचे सालांत नक्त ऐवज पुण्यांत देत जावा. कलम १

अदवानी तालुका पेशजीप्रमाणें नवाब निजाम (अ)लीखान बहादर यांजकडे चा

---

(387) It was at the same time stipulated that Tippoo should not attack the Táluká of Adwáni which was to be continued to Nawáb Nizám Allikhán Báhádur, as before. And that the Táluká and fort of Nargund and the Sansthán of Kittoor lately taken by Tippoo, should be surrendered to the Peshwá and that Kálo Bahirav and the Desai of Kittor and other subjects of the Peshwá in the confinement of Tippoo should be released by him and vice versa. And that the fort of Badámi and the territory worth Rs. 1½ Lacs, surrendered by Tippoo, should remain with the Peshwá.

[ A. D. 1787-88. ]

| | |
|---|---|
| | १७०६ क्रोध(धी?)नाम संवत्सरे सन ११९८ हिजरी. |
| १२००००० | सन सीत समानीन शके १७०७ विश्वावसु संवत्सरे सन ११९९ हिजरी. |
| ४८००००० | |

पैकीं वजा. रुपये.

| | |
|---|---|
| २००००० | वरात आनंदराव भिकाजीराव रास्ते यांची पेशजीं वरात जहाली आहेत. |
| १००००० | सूट एक साला. |
| ३००००० | |

बाकी. ४५००००० रुपये.

तपशील.

| | |
|---|---|
| ३०००००० | तूर्त. |
| | १५००००० नक्त. |
| | १५००००० जिन्नस. |
| | ३०००००(३००००००) |
| १५००००० | सावकारी निशा. |
| | नक्त. रुपये. |
| | ७५०००० वैशाख शुद्ध पौर्णिमा |
| | ७५०००० आषाढ शुद्ध पौर्णिमा. |
| | १५००००० |
| ४५००००० | |

एकूण पंचेचाळीस लक्ष रुपयांचा फडलावा. तालुके मजकुरास उपद्रव लागूं नये. कलम १.

नरगुंद किल्ला तालुक्यासुद्धां पेशजीप्रमाणें व कितुर संवस्थान नवीन पेशजीचे तह अलीकडे तुह्मीं घेतले ते तालुक्यासुद्धां सोडावे, त्याचा अंमल सरकारांत राहील. कलम १.

काळो बहिरव व कितूरचा देसाई व सरकारचे तर्फेचे पाडाव तुह्मांकडे गेले असतील ते तुह्मीं सोडावे, तुह्मांकडील पाडाव सरकारांत असतील ते सरकारांतून सोडावे; परस्परें कोणी कोणाचे ठेऊं नयेत. कलम १.

बदामीचा किल्ला दीढ लक्ष रुपयांचा तालुकासुद्धां तुह्मीं सरकारांत दिल्हा तो सरकारांत राहील. कलम १.

शा कराराप्रमाणें क्षेप निक्षेप करून द्यावा.

कलम १.

पहिला करारनामा बेलभंडारसुद्धां आहे तो करार व समस्त आहे. कलम १.

एकूण सात कलमें करारांत आलीं आहेत, याप्रमाणें अमलांत यावें. येणे प्रमाणें कलमबंदीची यादी टिपू सुलतान यांस लिहून दिल्ही असे. यादी १.

रसानगी यादी.

३८८–( ९४६ ) सरकार, व नवाब निजाम अलीखान बहादुर व नवाब टिपू सुलतान बहादुर यांणीं यावत् चंद्रसूर्य ईश्वराचे इच्छेकडून आपले आपले सरकारचे दस्तूरप्रमाणें शपथपूर्वक इतिफाकानें राहून करारमदारास अंतर न करितां दोन्हीं कडून आपले आपले रयासतेची बंदोबस्ती व खलखुलाचे रफाबीयतीवर असावें, अगर चवथा कोणी मुखालीफ आपेआप तीहीं दौलतींतून एका दौलतीवर चालून आल्यास इतिफाकानें तिन्ही सरकार मिळोन मुखालीफाची तंबी करावी, याप्रमाणें करारनामा टिपूसुलतान बहादुर यांस लिहून दिल्हा असे. करारनामा १.

सबा समानीन मया व अलफ जमादिलावल १७

रसानगी यादी.

३८९–( ९४९ ) नवाब टिपू सुलतान बहादुर यांजकडील महाल वगैरे सरकारांत घेऊन मामलत सांगितली होती, त्यास हल्लीं नवाब मवसुफ यांजकडे द्यावयाचा करार केला असे, तरी यांजकडील अमीन येतील त्यांचे हवालीं करून कबज घेणें ह्मणोन, मामलेदारांचे नांवें. सनदा.

सबा समानीन मया व अलफ जमादिलाखर २४

१ त्रिंबकराव येशवंत व गंगाधर विश्वनाथ परभारे.

९ तालुके धारवाड.

| | |
|---|---|
| १ कर्यात तडकोट. | १ कसबे मारडगी वगैरे गांव. |
| १ कर्यात हुबळी. | —— |
| १ कर्यात यनमडी. | ५ |
| १ परगणे मिश्रीकोटे. | १ परगणे गदक. |

---

( 388 ) A treaty of alliance was concluded between the Peshwá, Nawáb Nizám Allikhán Báhádur, and Nawáb Tippoo Sultán Báhádur, by which the Powers bound themselves to live on terms of friendship with each other and to unite together to defend themselves against outsiders.

A. D. 1786-87.

( 389 ) The territory belonging to Tippoo which was taken by the Peshwá was now ordered to be restored.

A. D. 1786-87.

सहा माहाल वगैरे यांजविशीं. सनद.

१ कृष्णाजी विश्वनाथ कमाविसदार कसबे मोरब यांस.

१ शेशगीरराव माधव यांजकडे. बीतपशील.

१ परगणे मुलगुंद. १ कसबे बेहटी. १ मौजे सुल.

३ एकूण तीन महाल वगैरे यांजविशीं. सनद.

१ विसाजी महादेव दिंमत महिपतराव कृष्ण यांचे नांवें परगणे नवी हुबळी याजविशीं. सनद.

१ लक्ष्मण बाबूराव यांजकडे.

१ परगणे लखमेश्वर. १ ठाणें शिर[ह]टी परगणे लखमेश्वर.

२ दोन महाल व ठाणें यांजविशीं. सनद.

१ तुकोजी होळकर यांजकडील महाल वगैरे. बीतपशील.

१ परगणे नवलगुंद. १ कर्यात बेटगिरी.

१ परगणे कुंदगोळ.

१ परगणे जुनी हुबळी. ४

एकूण चार महाल वगैरे यांजविशीं हवालीं करणें ह्मणोन. सनद.

१ दौलतराव हिंदुराव घोरपडे यांचे नांवें किल्ले गजेंद्रगड सरकारांतून तुह्मांकडे आहे, त्यास बहाद्दर यांजकडे देविला असे, तरी किल्ला तालुका सुद्धां यांजकडील अमीन येतील त्यांचे हवालीं करून कबज घेणें ह्मणून.

७

रसानगी याद.

३९०–( ९९१ ) नवाब टिपू सुलतान बहाद्दर यांजकडील बंदीवान तहांत सोडावयाचा करार जाहला आहे; सबब त्यांजकडील राघवेंद्र नाईक जखाते यांचीं मुलेंमाणसें वगैरे मनोलीस अटकेस ठेविलीं आहेत. बीतपशील.

सबा समानीन मया व अलफ रजब १९

(390) As agreed at the treaty, orders were issued for the release of Tippoo Sultán's subjects who were under imprisonment by the Peshwá.

A. D. 1786-87.

1 Female relations of Rághawendra Naik.

1 Komber Naik and family.

1 Narsáppá Naik and family and others.

६ राघवेंद्र नाईक यांजकडील बायका.
१ आई. १ कन्या. १ चुलत बहीण.
२ भावजया. १ चुलती.
६

२४ गुमास्ते यांचीं माणसें.
२ कोन्हेर नाईक खुद्द व स्त्री.
२ नरसापा नाइक खुद्द व स्त्री.
१ नारापा.
४ कवताल रामया.
१ खुद्द.
१ स्त्री.
१ पुत्र.
१ सून.
४
२ सखाराम नाईक खुद्द व स्त्री.
२ राघवेंद्रभट मछलीकर खुद्द व आई.
२ येंकणा सतारी खुद्द व कन्या.
२ सीनापा याजकडील बायका.
१ स्त्री.
१ आजेसासू.
२
४ बाळाचार्य.
१ खुद्द.
१ स्त्री.
१ पुत्र.
१ सून.
४
१ बालापा.
२ बिंबाचार्य याच्या बायका.
१ स्त्री.
१ सासू.
२
२४

२ आच्यारी व पाणका
३२

एकूण बत्तीस असामी सोडून देविले असेत, तरी आनंदराव भिकाजी रास्ते यांजकडे किल्ले बदामीस पावते करून पावलियाचें कबज घेणें ह्मणोन, परशराम रामचंद्र यांस.

सनद.

रसानगी, नारो शिवराम चक्रदेव.

सबा समानीन मया व अलफ रजब १९

३९१–( ९९२ ) नवाब टिपू सुलतान बहाद्दर यांजकडील बंदीवान तहांत सोडावयाचा करार जाहला आहे, सबब त्यांजकडील शिरेहटीचे अमलदार वगैरे गजेंद्रगडास तुह्मांकडे अटकेस ठेविले होते ते बीतपशील.

१ गुलाम हुसेन अमलदार.

---

A. D. 1786-87. ( 391 ) Similarly Gulám Husen, officer of Sirehatti, was ordered to be released.

१ गुलाम मोहिदीन अमलदाराचा भाऊ.
१ महमदशेख अमलदार याचा चुलतभाऊ.
१ ह्मकरेजखान किल्लेदार याचा कारभारी.
१ मीर सुलतान अल्ली कमाविसदार.

५

एकूण पांच असामी सोडून देविले असेत, तरी आनंदराव भिकाजी रास्ते यांजकडे किल्ले बदामीस पावते करून पावलियाचें कबज घेणें ह्मणोन, दौलतराव हिंदुराव घोरपडे यांस. सनद.

रसानगी, नारो शिवराम चक्रदेव.

३९२–( ९५३ ) भरमी नाईक कारेवी नवाब टिपू सुलतान बहाद्दर यांजकडील रामदुर्गचें ठाणें सरकारांत घेतलें, ते समई यास धरून कैदेंत ठेविला आहे तो हालीं सोडून देविला असे, तरी धारवाडास पोहोंचाऊन देऊन पावलियाचें कबज घेणें ह्मणोन, परशराम रामचंद्र यांस. सनद १.

सबा समानीन मया व अलफ रजब २४

रसानगी यादी.

३९३–( ९५५ ) तालुके नरगुंद, वेंकटराव भास्कर यांचा नवाब टिपू सुलतान बहाद्दर यांणीं घेतला होता, तो हालीं त्यांणीं सरकारांत दिल्हा तो सरकारांत ठेऊन तेथील मामलत तुह्मांस सांगितली असे, तरी इमानें इतबारें वर्तोन अंमल चौकशीनें करून कच्चा हिशेब सरकारांत देणें. मामलतसमंधें. कलमें.

सबा समानीन मया व अलफ साबान १०

श्रीवेंकटेश वगैरे देवस्थानें आहेत, तेथील पूजा नैवेद्य कार्याकारण पाहून देवाकडे चालवणें. विशेष खर्च करूं नये. कलम १.

गांवगन्ना कमाविसीचे कामास कारकून लागतील ते कार्याकारणें ठेवणें, व-

इनामती व वर्षासनें सालाबादी चालत असतील त्यांची चौकशी करून हुजूर समजावणें, समजोन आज्ञा होईल त्याप्रमाणें करणें. कलम १.

शेत सनदी प्यादे गांवगन्ना सालाबंदी आहेत त्यास उपयोगी प्यादे शेत सनदी

(392) Similarly Bharmi Naik Kárewi, who was made prisoner at the capture of Rámdurg from Tippoo was ordered to be released.

A. D. 1786-87.

(393) Táluká Nargund belonging to Vyankatrao Bháskar was formerly taken by Tippoo. It was now surrendered by him to Government, and was given in charge of a Mámlatdár.

A. D. 1786-87.

हिवाट हुजूर आणून समजावणें, समजोन मजुरा पडेल. कलम १.

सुभ्याचा वाडा पेठेंतील मोडला आहे, तो बिगारीनें नीट करणें, व गांवकुसूं पेठेचें पडलें आहे, त्याचीपड झड नीट करावयासी शेंपन्नास रुपये लाऊन कार्याकारण असेल तें नीट करणें. कलम १.

भोजनखर्च चौकशीनें खर्च करणें. शिरस्तेप्रमाणें मजुरा पडेल. कलम १.

नरगुंद व सोमापूर येथील पेठेंतील घरेंदारें मोडलीं आहेत, त्यांस कौल देऊन आबादी करणें. कलम १.

शिबंदीचे लोकांची नेमणूक असामी.

७०० हुजूरचे गाडदी.

५०० निसबत राघो विश्वनाथ.
१०० रोहिले.
१०० दिंमत शेखलालण.

७००

८०० तुमचे निसबतीचें माणूस चांगलें पाहून ठेवणें.

१०० बहादूर विडेकरी.
७०० मदरी वगैरे जागाचे.

८००

१५००

एकूण एक हजार पांचशें असामी पैकीं हुजूरचे लोकांचा जाबता येईल त्याप्रमाणें रोजमरा देत जाणें व तुमचे ठेवणुकेचें माणूस आहे, त्याचा रोजमरा माहालचे शिरस्तेप्रमाणें मजुरा पडेल. कलम १.

जकीन्यास व शिबंदीस साल मजकुरीं ऐवज खर्च होईल, त्यास माहालचा वसूल चालीस लागोन साहुकारास ऐवज पावेतों व्याज मात्र मजुरा पडेल. कलम १.

असतील ते ठेवणें. कलम १.

दरकदार कारकून हुजुरून करार होऊन येतील त्यांचे इतल्यानें काम करीत जाणें. इतल्याशिवाय करूं नये. कलम १.

खेरीज मुशाहिरा. कलमें.

१ रोशनाई खर्च सुभा व किल्ला मिळोन.
१ तैवज खर्च.
१ धर्मादाव.
१ उलफे खर्च.
१ दफ्तर खर्च वगैरे किरकोळ.
१ खैरात.

६

एकूण सहा कलमें लिहिलीं असेत. चौकशीनें खर्च करणें. मजुरा पडेल. कलम १.

तुमचे निसबतीचे स्वार ३०० तीनशें करार करून दिल्हे आहेत, त्यास धारवाडचे नेमणुकेचे शिरस्तेप्रमाणें मजुरा पडेल. घोडें माणूस चांगलें बाळगणें. कलम १.

तुमची व तुम्हांकडील कारकुनांची नेमणूक पुढें समजोन करून दिल्ही जाईल. कलम १.

महालीं सालमजकुरींची सन सबाची बाकी राहिली असेल त्याची चौकशी करून वसूल घेऊन हिशेबीं जमा करणें, आणि हुजूर समजावणें. कलमें.

बहिरजी मोन्या बहादुर बीड्यास सरकार कामास आला, सबब त्याचा लेक येशवंतराव मोन्या यास पेस्तर सालापासून तैनात सालीना रुपये २०० दोनशें करार केले असेत, तरी याजपासून किल्यावर चाकरी घेऊन तैनात पैकीं दुमाही रुपये २० वीस देत जाणें. जे बाद राही-

बाजे हशम चोपदार व खासबारदार व जासूद ढलाईत गोलंदाज वगैरे लोक कार्याकारण लागतील ते ठेवणें; शिबंदीचे नेमणुकींत मजुरा पडतील. कलम १.

ल ते आखेर साली सर्वांबरोबर पावेल. कलम १.

एकूण सोळा कलमें करार केलीं असेत, तरी सदरहू कलमांप्रमाणें वर्तणूक करणें ह्मणोन, रघुनाथ चिंतामण यांचे नांवें. सनद १.

रसानगी यादी.

३९४–( ९७९ ) नवाब टिपू सुलतान बहादर यांचे नांवें जाब कीं, आपणांकडे पेशकसीचा ऐवज इस्तकबिल सन सलास समानीन शके १७०४ शुभकृत्‌नाम संवत्सरे सन ११९६ हिजरी तागायेत सन सीत समानीन शके १७०७ विश्वावसुनाम संवत्सरे सन ११९९ हिजरी एकूण चार सालांपैकीं हप्तेबंदीचा ऐवज येणें त्या ऐवजीं आषाढ शुद्ध पोर्णिमा सन समान समानीनचे हप्त्याचा ऐवज आला तो.

तिसा समानीन मया व अलफ रबिलावल ५

७४९९९९॥≈ होन बहादरी, व सुलतानी नाणें १७६४७०॥ दर ४। प्रमाणें रुपये.
।≈ नक्त.

७५००००

एकूण सात लक्ष पन्नास हजार रुपये शिवशंकर साहुकार यांचे मारफतीनें सरकारांत पावले असेत ह्मणोन. जाब १.

३९५–( १०१४ ) नवाब टिपू सुलतान बहादर यांचे नांवें जाब कीं, आपणाकडे पेशकसीचा ऐवज येणें, त्यापैकीं शके १७०८ पराभवनाम संवत्सरे सन १२०० हिजरी सन सब्रा समानीनचे सालचा ऐवज येणें त्याचा भरणा. रुपये.

इहिदे तिसैन मया व अलफ जिल्काद २१

११९९९९६ प्रत होन बहादरी सुलतानी व एकेरी नाणें २८२३९२ दर ४। प्रमाणें.
४ प्रत होन हैदरी नाणें १ एक.

१२०००००

(394) Rs. 7½ Lacs were received from Nawáb Tippoo Sultán Bahádur in part payment of the tribute due from him for 4 years.
A. D. 1788-89.

(395) Rs. 12 Lacs were received from Tippoo Sultán on account of tribute for the year A. D. 1786/87.
D. D. 1790-91.

